# सातारचे श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज

यांचे वंशाचा

व

## प्रतिनिधी आणि अष्टप्रधान यांचा इतिहास.

विष्णु गोपाळ भिडे चिटणीस निजबत पंतसचिव

यांणीं तयार करून

भोर येथील छापखान्यांत छापिला.



मुक्काम भोर.



सन १८६६

शके १७८८

# प्रस्तावना.

प्राचीनकाळीं या हिंदुस्थान देशांत विशेषेंकरून महाराष्ट्र देशांत हिंदुराजे राज्य करीत असतां त्यांचे हातून सर्व देश बहुत करून मुसलमानांचे ताबेंत जाऊन तो यवनाक्रांत झाला. आणि त्यापासून हिंदुधर्मास नानातऱ्हेचे त्रास व जुलूम होऊं लागले. त्यापासून लोकांस सोडवून हिंदुराज्याची स्थापना केली आणि हिंदु धर्माचें रक्षण केलें. असा जो "रजपूत घराण्यांतील चितोडे शहरचे शिसोदे महाराणे याचे घराण्यांतील महा प्रतापी शिवाजी महाराज असून" ते इकडे दक्षण प्रांतांत कसे आले व त्यानीं राज्य कारणें कशीं केलीं व मुसलमानांचा पराभव करून राज्य कसें संपादन केलें व राज्य चालविण्याच्या रीति ठरवून तें कसें चालविलें. आणि पुढें शिवाजीचे वंशज कसें झाले व सातारा येथें राज्याची गादी कोणीं कशी स्थापन केली आणि त्या राज्यवंशांत कोण कोण पुरुष पुढें कसे झाले. या-विषयीं माहिती ह्या पुस्तकांत आहे.

राज्यसंबंधानें पराक्रम करून मोठे पदवीस चढलेले प्रतिनिधी व अष्टप्रधान यांचे इतिहासाची माहिती लोकांस समजणें फार महत्वाची व योग्यतेची आहे. आणि अशी योग्य माहिती सर्व लोकांस समजणें अवश्य जाणून आम्ही साताऱ्चे दप्तरांतील चांगले माहितीवरून व दुसऱ्या अनेक दाखल्यावरून हा ग्रंथ तयार केला आहे.

श्रीमंत महाराज शिवाजी राजे यांचे मूळ पुरुषाचें वर्णन एके भागांत लिहून पुढें शिवाजी महाराजापासून जितके पुरुष झाले त्याचे व प्रतिनिधी आणि अष्टप्रधान यांचे एक एक भागांत वर्णन केलें आहे, शेवटीं दरबारच्या स्वारीची वगैरे माहिती दिली आहे.

## सूचना.

या ग्रंथांत कांहीं हस्तदोषानें अशुद्धें राहिलीं आहेत. तथापि हा ग्रंथ शास्त्रीय रीतीचा नसून कांहीं श्रुतिस्मृति सारखा नाहीं म्हणून जीं अशुद्धें आहेत तीं वाचतांना सुज्ञ वाचणारांस कळतील अशीं आहेत. यासाठीं त्याविषयीं शुद्धिपत्र घातलें नाहीं.

मीं या पूर्वीं कधींही ग्रंथ लिहिला नाहीं. ग्रंथ लिहिण्याचें काम फार कठीण व मोठे पंडितासही अवघड असें आहे. तें माझे हातून चांगलें व्हावें तसें होणें कठीण आहे. परंतु जी माहिती मिळाली तीवरून यथामती हकीगत लिहून नम्रतेनें लोकांपुढें ठेविली आहे. यांतील चुकाविषयीं सुज्ञ लोक क्षमा करून केलेले श्रमास ग्राह्य करतील अशी आशा आहे.

# शिवाजीमहाराजांचा इतिहास.

## भागपहिला

महाराष्ट्रराज्याची स्थापना श्रीमन्माहाराज छत्रपति शिवाजीराजे यांणीं केली. शिवाजीमहाज हे रजपूत घराण्यांतील उदेपुरानजीक चितोडें शहरचे शिसोदे महाराणे याज पैकीं आहेत. त्याचें जन्मवृत्त असें आहे कीं,—

मूळपुरुष सजणसिंह महाराणे ह्मणून चितोडें शहरांत राहणारे होते त्याजला तीन पुत्र झाले, त्यांचीं नांवें,

पहिला. दिलीपसिंह.

दुसरा. सिंहाजी.

तिसरा. भोसाजी.

या पैकीं तिसरा भोसाजी हे चितोडें शहरानजीक मोठे किल्ल्याजवळ भोसावत ह्मणून एक गांव आहे तेथें येऊन राहिले. आणि तेव्हां पासून यांचें उपनाव भोसले असें ह्मणूं लागले "महाराणे हा तद्देशीय शब्द आहे" त्यासच महाराज असें इकडे ह्मणूंलागले. त्या भोसाजीचे दुसरे भाऊबंद देवराजजी वगैरे दहा असामी होते. त्यांतून खेलकर्ण व मालकर्ण

हे उभयतां बंधू दक्षिणदेशीं येऊन अहमदनगरचे पादशाहा जवळ चाकरीस राहिले. त्यांस दरएकास पंधराशें प्रमाणें तीनहजार स्वारांच्या सरदाऱ्या देऊन त्यांचे नांवें चाकरीचा सरंजाम चाकणचौऱ्यायशीं व पुरंदरपरगणा व सुपेंमहाल असे तैनाती बद्दल लावून दिलेहोते. नंतर ते उभयतां बादशाहाचे स्वारी बरोबर फिरतअसतां खेळकर्णे हा लढाईंत ठार झाला. तेव्हां त्याची मोठी कीर्त्ती होऊन खेलोजीमालोजी अशीं दोघांचीं नांवें पडलीं. पुढें मालोजी राहिले ते चासकमानी या गांवीं नदीचे डोहांत बुडाले. तेव्हां मालोजी यास बाबाजीभोसले या नांवाचा एक पुत्र होता तो लहान सबब त्याचे बापाचा सरंजाम अव्यवस्था नहोण्याकरतां बादशाहानें सरकारजमेस ठेविला.

नंतर बाबाजीभोसले यांस घेऊन त्याची मातोश्री दौलताबादे पासून वेरूळघुमेश्वर ह्मणून पांच कोशावर एक गांव आहे त्या गांवीं येऊन राहिली. तेथेंच बाबाजीभोसले यांचें लग्न झालें. पुढें कांहीं दिवसांनीं भीमेचे काठीं येऊन देऊळगांव व खानवटे व जिंती या तीनगांवच्या पाटीलक्या त्यांणीं खरेदी घेतल्या. तेथें आपण गुमस्ते ठेऊन वेरूळगांवीं पुनःपरत जाऊन राहिले. त्यास तेथें दोन पुत्र झाले. त्यांत पहिला मालोजी. यांचा जन्म शके १४७४ सन १५५२ इसवीसालीं

झाला. धाकटा विठोजी या उभयतांचीं लग्नें झाल्या वर सर्व कुटुंब व खटलें घेऊन बाबाजीभोसले हे देऊळ गांवीं येऊन वतना वर गुजारा करून राहिले. नंतर बाबाजीभोसले मृत्यु पावले. त्या वेळेस उभयतां चिरंजीवांच्या उमरी अदमासें सतरा अठरा वर्षांच्या होत्या.

मालोजी व विठोजी हे उभयतां प्रतिवर्षी कुनोहाळपर्वत ऊर्फ श्रीशंभूमहादेव शिखर शिंगणापूर याचे दर्शनास येत होते. आणि त्या उभयतांची निष्ठा श्रीजवळ फार असे; ते-व्हां एक वर्षी उभयतां दर्शनास जात असतां त्या पर्वताच्या एके झाडी खालीं बसले होते. तेथें श्रीशंभूची कृपा होऊन गोसाव्याचे वेषानें मालोजीस दर्शन देऊन तुमचे वंशीं राज्य मिळेल असा आशिरवाद देऊन गोसावी गुप्त झाला. हें वर्तमान मालोजीनें आपले बंधु विठोजी यास सांगून दोघांनीं देवदर्शनें घेऊन देवास नवस केला कीं, आमचे वडलाची दौलत आह्मास मिळाली तर आह्मी येथें एक तलाव बांधूं असा नवस करून तेथून निघून फलटणचे वणगपाळराव नाईक निंबाळकर यास जाऊन भेटले त्याणीं उभयतांचा आदर-करून दर असामीस सालीना बाराशें होन प्रमाणें तैनात-करून आपले जवळ चाकरीस ठेविलें.

पुढें निंबाळकर हे कोल्हापुरकरा वर स्वारी करण्यास

गेले त्यांज बरोबर मालोजी व विठोजी असतां तेथें निंबाळ करांचे लश्करा वर विजापुरचे बादशाहानीं रवाना केलेली फौज येऊन उभय लश्करची लढायी झाली त्या लढायींत मालोजी व विठोजी निघोडे स्वार होऊन हत्तीवर निशाणें होतीं; त्या हत्तीस भाले लावून बादशाहाचे फौजेचा मोहोरा माघारा फिरविला. आणि बहुत पराक्रम करून यश मिळविलें. त्या योगें त्याची मोठी कीर्ती होऊन तें वर्तमान बादशाहाचे वकिलांनीं अहमदनगरचे बादशाहास श्रुत करून विनती केली कीं हे उभयतां भोसले आपले पदरचे त्या अर्थी हेही सरकार सान्निध्य असावे तें बोलणें सरकारांत मान्य होऊन उभयतां भोसले यांस पत्रें पाठवून आणविण्याची आज्ञा लुकजी जाधव सरदार यास झाली त्या वरून त्यांणीं पत्रें देऊन बोलावावयास जासूद देऊन देऊळगांवीं पाठविलें त्या संधीस मालोजी व विठोजी हे निंबाळकराचा निरोप घेऊन घरीं आले होते त्यांस तीं पत्रें पावलीं त्यांचीं उत्तरें आज्ञेप्रमाणें येतों अशी देऊन आपण फलटणास येऊन निंबाळकरास तें वर्तमान सांगून त्याचा निरोप घेऊन श्रीशंभुमहादेवाचें दर्शन घेऊन देऊळगांव येथें पुनः परत येऊन आईची आज्ञा घेऊन अहमदनगरचे पादशाहा कडे गेले.

तेथें गेल्या वर अगोदर पातशाहा यास भेटून त्याचे

दरबारास राजवाड्यांत गेले. त्यांणीं उभयतांचा मोठा सन्मान करून जाधवराव यास आज्ञा करून त्याची दौलत जमेस केलेली त्यांचे वडिलाकडे सरंजाम चालत होता; तो यांजकडेस देण्यास सांगितला. त्याप्रमाणें त्यांणीं देऊन तीनहजार स्वारांचे सरदारीवर बहुत दिवस चाकरी करीत होते; त्यांणीं मोठी योग्यता मिळविली.

या उभयतांनीं कांहीं दिवसांनीं घरीं येऊन आपलीं लग्नें केलीं. त्यांत मालोजी भोसले यांस वणंगपाळराव नाईक निंबाळकर फलटणकर यांणीं आपली कन्या दिली लग्न मोठ्या समारंभानें झालें होतें. तिचें नांव दिपाबाई. हिणें शाहासरीफ पिरास आपल्यास पुत्र होण्याबद्दल नवस केला होता. नंतर पुत्र झाला त्याचें नांव शाहासरिफ असें नांव ठेविलें. त्यासच शाहाजी भोसले असें ह्मणूं लागले. त्याचा जन्म शके १५१६ इसवी सन १५९४

पुढें बादशाहाचे चाकरीस विठोजी भोसले यांस ठेऊन मालोजी भोसले श्रीशंभू महादेवाचे दर्शनास येऊन पूर्वी नवस केल्या प्रमाणें बहुत द्रव्य खर्च करून पाण्याकरतां एक मोठा तलाव बांधला

नंतर माघारे पुन्हा आपले चाकरीवर पातशाहाकडे गेले.

नंतर मालोजीराजे यांणीं आपला पुत्र शाहाजी रूपवान फार चांगला होता त्याजला शके १५२१ सन १५९९ या वर्षी शिमग्या मध्यें लुकजी जाधवराव सरकारचे मोठे सरदार होते त्यांस भेटण्यास नेला, तेव्हां जाधवराव हे त्या मुलास पाहून फार खूष झाले. आणि आपली कन्या जिजाबाई मांडीवर होती, तिला बोलिले कीं, हा नवरा तुझा होय. इतक्यांत तीं दोन्हीं मुलें एकमेकावर गुलाल उधळून खेळूं लागलीं. तें पाहून सर्व सभासद मंडळीस चमत्कार वाटला. तेव्हां मालोजी भोसले हे सभेंत उभे राहून बोलले कीं, जाधवराव हे आजपासून आमचे व्याही झाले यांस तुह्मी साक्ष आहां.

दुसरे दिवशीं जाधवराव यांणीं मालोजी राजास भोजनास बलाविलें. तेव्हां मालोजीनीं उत्तर केलें कीं तुम्ही व्याही व्हाल, तर आह्मी भोजनास येऊं, नाहीं तर येतनाहीं. हें वर्तमान जाधवराव यांचे स्त्रीस कळलें. तिचे मनास आलें नाहीं. कारण कीं, आपली मुलगी मोठे मातबर सरदारास द्यावी, यास देऊं नये. ह्मणून जाधवराव याणें ती गोष्ट त्या वेळेस मान्य केली नाहीं. तेव्हां आह्मास ही मुलगी कर्तव्य आहे ह्मणून मालोजी राजे ह्मणाले. अशीं परस्पर आग्रहाचीं बोलणीं वाटत चालली. म

ध्यस्त रीतीनें निश्चयांत नहोई. दुराग्रह दोन्हीं कडे पड ला. आग्रहानें मालोजीराजे बहुत प्रयत्न व श्रीदेवीची प्रार्थना करते झाले. शके १५२५ माघशुध्द १५ सन १६०३ चे दिवशीं आपलें शेत बाग मळा होता, तेथें एकटेंच जावें, असें मनांत येऊन गेले. अस्तमान समय झाला. त्या सम यीं एकाग्र चित्तें जाधवराव यांचा आपला कलह ईश्वर क सा सिध्दीस नेईल. आह्मास भाग्य नाहीं. ह्मणोन यांचना केली. "सोयरीक दुसऱ्यास देणें तेव्हां पुरुषार्थच काय उर ला याहून मरण बरें." असे चिंताग्रस्त होते इतक्यांत श्रीदे वीचा साक्षात्कार होऊन देवीची आज्ञा झाली कीं, तुझा भा व शुध्द पाहून तुज वर कृपा करावी; ह्मणून प्रसन्न आहे. तु- झे कुळींत श्रीसांभ अंशें करून अवतार घेऊन, धर्म स्थाप न करणारा व देवब्राह्मणास पीडा झाली आहे; ती दुर करणा रा असा तुझे वंशीं एक शककर्ता होऊन, पुष्कळ पुरुष राज्य करतील.

या प्रमाणें वर देऊन जवळ एक वारूळ होतें तें दाख विलें आणि सांगितलें कीं, यांत द्रव्य पुष्कळ आहे तें, तुं घे. तुझें मनइच्छित प्राप्त होईल.

असा साक्षात्कार झाला. तेव्हां श्रीची प्रसन्नता आणि दर्शन झालें. एवढयानें कृतकृत्यता मानून घरास जाणें अ-

थवा तेथून उलटणें विसरले. प्रहर रात्र झाली असतां विठोजी राजे यांणीं मालोजी राजे अद्याप कां आले नाहीत ह्मणोन शोधास पाठविले; तेव्हां मालोजी राजे बागेंत आहेत ह्मणून माणसांनीं सांगितलें. त्या वरून विठोजी राजे बागेंत गेले                    त्या वेळस त्यांजवळ श्रीचा प्रसाद साक्षात्कार झाला. हें वर्तमान संपूर्ण सांगितलें. त्याजवर तेही बहुत आनंद मानून रात्र फार झाली घरास चलावें ह्मणून बोलले आणि घेऊन आले.

दुसरे दिवशीं देवीचे साक्षात्कारांत जें वारूळ दाखवून द्रव्य सांगितलें तेथें जाऊन पहावें असें मनांत आणलें; परंतु द्रव्य साध्य झाल्यास कसें आणावें? कोठें ठेवावें? राज्य यवनाचें. द्रव्य जाऊन प्राण व प्रतिष्ठा दोन्हीं जाणार. असे विचारांत दुसरा दिवस गेला. दुसरे दिवशींचे रात्रीस श्रीचा दृष्टांत झाला कीं तूं भय पावलास. मी प्रसन्न होऊन द्रव्य दिलें त्यास कदापि विघ्न होणार नाहीं या द्रव्याचा त्वां बहुत धर्म करावा. चिंतिवारत असल्यास तें काढून श्रीगोंदें एथें शेषवा नाईक यांचे घरीं ठेव. तो ठेवून पाहिजे ते वेळेस तुझें तुला देईल. या प्रमाणें दृष्टांत झाल्या वर मालोजी राजे आणि विठोजी व दुसरे विश्वासू मनुष्य घेऊन वारुळा सन्निध्द जाऊन खणावयास लागले तों आंत मोठा सर्प पाहिला तेव्हां भयाभी

त होऊन पळाले आणि मालोजीराजे त्यापुढें राहून हात जोडून बोलले कीं श्रीदेवीनें मला एथें द्रव्य सांगितलें. त्याप्रमाणें आहे, तरी तुह्मी कृपा करून द्यावें. तेव्हां सर्प तेथून गेला. नंतर तें सर्व खणून श्रीनीं सांगितल्या प्रमाणें शेषा पाना-ईक यांज कडे ठेविलें. तें त्यांणीं ठेवण्याचें मान्य केलें.

नंतर भोजन झाल्या वर तुह्मास श्रीदेवीनीं द्रव्य दिलें. तेव्हां तुमचा भाग्योदयच आहे. तुह्मास राज्य प्राप्त झाल्या वर तुमची पोतदारी आह्मास वंश परंपरागत करून द्यावी. तें त्यांणीं मान्य केलें. श्रीचे कृपें करून त्याच्या घरीं द्रव्य झालें तेणें करून दिवसें दिवस त्यांची योग्यता वाढली. निजामशाई सरकारची चाकरी करीत होतेच. आणि खींहजार घोडीं खरेदी करून पागा वाढविली. श्री शिखर महादेव एथें चैत्रमाशीं यात्रा भरते तीस पाण्या वांचून यात्रेकऱ्यांचे फार हाल होतात ह्मणून तलाव बांधला. श्रीकृष्णेश्वराचे देवालयाचा जीर्णोधार केला. याप्रमाणें पुष्कळ देवालयें बांधलीं व दान धर्म केले.

जाधवराव यांचे शरिर संबधाचा प्रयत्न करण्याकरतां निंबाळकर अनुकूळ करून त्याचे द्वारें पातशाहास श्रुत केलें कीं, आग्रहास पडून जाधवराव आमचा शरिरसंबंध करीत नाहीं वरून पातशाहानें जाधवरावास ह्मटलें कीं तुह्मीव

ते शरिर संबंधीं. असें असतां आग्रहा करतां तो करूंनये मुलगी द्यावी त्यावरून जाधवराव यांणीं अनमान करून उत्तर सांगून पाठविलें. तेव्हां अनमान काय निमित्य करतात हें विचारायास पाठविलें. त्यांणीं राजे यांचें वैभव - आमचे बराबरीचें नाहीं वरकड शरिर संबंधीं आहेच. आमचे घरांत सर्वांचे विचारास समान बरोबरीचें पाहून कन्या द्यावी, असें आहे. ते समयीं पातशाहाचे मनांत आलें कीं आह्मी सांगितलें असतां, आग्रह करतात. त्या पेक्षां मालोजी भोसले यास याजहून सवाई मनसब व वैभव देऊन - ही गोष्ट करावी. भोसले मनसब देण्यास योग्य व शूर - कर्मिंकाजें ही केलीं आहेत. ह्मणोन पंचहजारी मनसब - असा किताब लिहून शिवनेर व जुनर वगैरे तालुके सरंजाम व साहेब नौबन दिली. जाधवराव याहून भाग्यवान केलें आणि याउपर यांचे पुत्रास कन्या द्यावी; ह्मणोन आज्ञा केली. तेव्हां जाधवराव व त्याची स्त्री या सर्वांस हर्ष होऊन पातशाहाचे मनोगत व मुल सुंदर गुणवान कुलीन ह्मणूनमान्य करते झाले. दौलताबादेस लग्न समारंभ शके १५२६ सन १६०४ या वर्षी लग्न केलें त्या समारंभास पातशाहा येऊन योग्यता दिली. लग्नाचा समारंभ फारच मोठा व - चांगला झाला.

शाहाजीराजे भोसले थोर होऊन त्याजकडे बापाचे वे ळची जाहागिर वगैरे चालत होती; परंतु अहमदनग रचे राज्यांतील बहुतेक मुलुक मोंगलांचा पातशाहा शाहाजान याणें घेतलाच होता. पुढें अहमदनगर-चे बादशाहास त्याचा चाकर फत्तेखान याणें कैद क रून त्याचे गळ्यास फांस लावून जिवें मारिलें. असें दुष्कर्म केलें. नंतर त्या फत्तेखानानें अहमदनगरचे-बादशाहाचा मुलगा गादीवर बसवि ला. पुढें मोंग लाचे बादशाहाकडून फत्तेखानाकडे सनद आली; त्यांत पूर्वी शाहाजी भोसल्याकडे चालत आलेल्या जा हगिरी पैकीं ही मुलुख दिला. त्या समयीं नगरचे पात शाहाचा मुलगा लहान सबब तें राज्य फत्तेखानाकडे राहिलें.

असें झाल्यावर शाहाजी भोसले खिन्न होऊन तेथू न निघून महमद अदिलशाहा विजापूरचा पादशा-हा याचा आश्रय धरून त्याजपाशीं चाकरीस राहिले. त्याचे चुलते विठोजी यास पुत्र आठ होऊन त्यांचा वंश वावी गांवीं होता.

नंतर शाहाजी भोसले विजापुरचे पातशाहाजव-ळ कारभार करूं लागले. आणि कित्येक ब्राह्मण जव

ळ बाळगून बहुत किल्ले हस्तगत केले. आणि फौज जमा करून स्वाऱ्या केल्या. त्या शाहजीस विजापूरचे बादशा-हचे प्रधान मुरारपंत यांणी सहाय्यास घेऊन विजापूरक रांस भिमा व निरा यांमधला नवा मिळालेला मुलूख यां चा बंदोबस्त केला. तेणेंकरून शाहाजीचें चातुर्य प्रगट झालें. ह्मणून मुरारपंत याणें बादशाहा जवळ फारच शि फारस करून लश्करचा दुसरा अधिकार देववून कोल्हा र व बंगलोर व उसकटा व बालापूर व शेरा असे पांच परग ण्याची जाहगिर दिली. व आणखी मागाहून शाहजीचे-शौर्यावर बादशाहाची सुप्रसन्नता होऊन इंदापूर परगणा व बारामती परगणा व पुण्याजवळचे मावळांतील तळवट जमीन पुणेंप्रांताचे जाहगिरीला अधिक लावून दिली. त्या मुलकाचे संरक्षणाचे कामावर शाहजीनें दादोजी कोंडदे व या नांवाचा कोकणस्थ ब्राह्मण हुशार व भरंवशाचा का रकून नेमला होता.

या शाहजी भोसल्यास दोन स्त्रिया होत्या. पहिली जिजाबाई. जाधवराव यांची कन्या. दुसरी तुकाबाई मो-हिते यांची कन्या.

पहिलीस दोन पुत्र. त्यांत वडील संभाजी आणि धा कटे शिवाजी महाराज.

धाकटे शिवाजीमहाराज.

दुसरी स्त्री तुकाबाई यांस एक पुत्र त्याचे नांव व्यंकोजी तेच कर्नाटकांत शाहाजीस मिळालेले जाहगिरीचा उपभोग करीत चंदीचंदावर ऐथें संस्थान करून-राहिले त्यांचे वंशाकडे अद्याप चंदावर संस्थान चालत आहे.

थोरले स्त्रीचा वडील पुत्र संभाजी याजला शाहाजी कर्नाटकांत गेले ते समयी आपले जाहगिरीसह्नतर संस्थानीं लोक भांडतात यामुळे आपणास उपद्रव लागतो सबब एक कानिकगिरीचा किल्लेदार यांचे पारिपत्यास पाठविलें असतां तेथे संभाजीचा पराभव होऊन मृत्यु पावले.

थोरले स्त्रीचे धाकटे पुत्र शिवाजी यांचे संपूर्ण वर्णन "भाग दुसरा कारकीर्दु दुसरी" यांत केले आहे.

शाहाजी भोसले शाके १५८६ सन १६६४ या वर्षी मृत्यू पावले. त्यांचे वृंदावन श्रीशंभूमहादेव ऐथें प्रसिध आहे.



# भाग २रा.

## कारकीर्द शिवाजीमहाराजछत्रपतियांची
(शाके १५४९ सन १६२७ पासून शाके १७०२ सन १६८० पर्यंत)

---

शाहाजीमहाराज विजापुरास परतगेले तेव्हां; जिजाबाईसाहेब गरोदर वाटेनें सुरक्षित जाणार नाहींत ह्मणोन शिवनेरी किल्यावर ठेविली तेथें शाके १५४९ सन १६२७ इसवी वैशाख शुध्द तृतीयाशनवार रोजीं शिवाजीमहाराजांचा जन्म झाला.

शिवनेरी किल्यावर जिजाबाईसाहेब व शिवाजीमहाराज ७ वर्षे होते; त्या ठिकाणीं शिवाजीमहाराजांचा मूलपणीं छंद घोडयावर बसणें, हत्तीवरबसणें, तीर मारणें हा फार असे. आणि भारथ भागवतादियुद्ध कथा ऐकण्याची फार गोडी होती.

शाहाजीचे वडीलपुत्र संभाजी कर्नाटकप्रांतीं युध्दांत पडले. आणि जिजाबाई व शिवाजी इकडे शिवनेरीस फार दिवस राहिली. यामुळें शाहाजी यांजलीं शिवाजीस पाहण्याची फार उत्कंठा होऊन जिजाबाईसाहेब आणि शिवाजीमहाराज यांस कर्नाटक प्रांतीं नेऊन

भेटले. आणि मग शहाजी व शिवाजी विजापुरास-आले.

मुरारजंग देवराव विजापूरचे बादशाहाचे दिवाण यांणीं शहाजीराजे यांचा पराक्रम पादशाहाशीं वर्णन करून तारिफ केली. त्याजवरून पादशाहानीं शहाजीस पोशाख देऊन पुणेदेश, सुपे, इंदापूर, बारामती असे बारामावळ सरंजाम दिला. त्याचा कारभार शाहाजीयाणें दादोजीकोंडदेव "त्याचाएक विश्वासू कारकून" यांजकडे सांगितला.

दादोजीकोंडदेव यांणीं मावळांत लांडग्यांचा फार उपद्रव झालाहोता ते लांडगे मारले. व मुलुखशामलाचे उपद्रवानें उजाड झालाहोता; तो बहुतकरून वस्तीकरून लावणीची तजवीज केली. व निमतानेव धारे बांधले.

शिवाजीराजास यवनांचे राज्याचा व मुसलमानाचे धर्माचा तिरस्कार असे. आणि लहानपणापासून त्याचे मनांत हिंदुधर्मस्थापावा असें होतें. या मुळें विजापुरी बादशाहास भेटणें विषयीं शिवाजीस शाहाजी राजे आग्रह करीत असतां "यवनास भेटणें व त्याचें अन्न खाणें आणि राहणें अतिनीच आहे." हिंदुधर्मस्था-

पावा असें वारंवार बोलअसत. शाहाजीराजे याणें आपण व जिजाबाईसाहेब यांजकडून व दुसरे मंडळीकडून शिवाजीस समजून सांगितलें. तथापि तो शिवाजीचा दुराग्रहच होता.

शेवटीं एके दिवशीं फार आग्रह करून मुरारपंत-दिवाण यांचे सल्यानें शाहाजीराजेयांणीं शिवाजीराजे यास पादशाहाचे दरबारास नलें. तेथें गेल्या वर पाद-शाहास मुजरा किंवा कांहीं अदाब नकरतां शिवाजीमहाराज कचेरींत बसले.

बादशाहा यांणीं मुरारपंतदिवाण यास प्रश्न केला कीं, शाहाजीराजेयांचे हेच पुत्र काय? त्यावरून दिवाण यांणीं उत्तर केलें कीं "निशस्त व बरखास्त दरबार अद्यापि पाहिलानाहीं; परंतु गुणवान् व शूर चांगले आहेत" अशी तारीफ केली. तेव्हां पादशाहानीं त्याचा सन्मान करून पोषारव देऊन निरोप दिला.

दरबारांतून घरीं आल्यावर शाहूराजेयांणीं विचार केला कीं, शिवाजीमहाराज यांचे मनोगत विपरीत-दिसतात. राज्य यवनी तेव्हां मोठ व मोठे होई पर्यंत यांजला दूर ठेवावें. आणिमुरारपंतयाससल्लाविचारल्यावरून त्यांणीं शाहाजीचे विचाराप्रमाणें सल्ला दिली.

विजापूर मुकामीं शके १५५९ सन १६३७ या वर्षी शिवाजीमहाराजांचें लग्न शिर्के यांचे मुलीबरोबर मोठे समारंभानें झालें. त्या बाईचें नांव सईबाई असें ठेविलें.

शके १५५९ सन १६३७ या वर्षी शाहाजीराजे यांणीं जिजाबाईसाहेब व शिवाजीराजे यांस पुण्यास रवाना केलें. आणि त्यांजबरोबर पुणें व मावळप्रांतीं जे पूर्वी शाहाजीनें दादोजीकोंडदेव यांस ठेविलेंहोतें ते हिशेब घेऊन विजापुरीं गेलेहोते त्यांस बरोबर दिलें.

शिवाजीमहाराज पुण्यास आल्यावर तेथें दादोजी कोंडदेव यांणीं रंगमहाल या नांवाचा एक वाडा बांधला होता त्यांत महाराज मातोश्रीसह राहिले.

शिवाजीमहाराज पुण्यास आल्यावर त्यांच्या मनांत ध्यास होता कीं वडिलांनीं मिळविलेलें खाऊन राहणें, यवनांचे अन्न खाणें ठीक नाहीं. सर्व पृथ्वी यवनाक्रांत झाली आहे. हिंदुधर्म बुडाला या साठीं कांहीं उद्योग व मसलत करून हिंदुधर्म स्थापावा.

ही गोष्ट शिवाजीनें दादोजीकोंडदेव यास सांगून सल्ला विचारली तेव्हां दादोजीनें उत्तर केलें; आपण मनांत आणलेले गोष्टीचा शेवट लागणें दुर्घट आहे. सर्व पृथ्वी यवनाक्रांत झाली. या करण्यास आपणास मात

वर स्थळें असावी. हिंदुराजे व फौज जागोजाग आ
पल्यास सहाय्य असावी. आपण ही जिवाहून अधिक
श्रम करावे तशात ईश्वरीप्रसाद व सिध्दपुरुषांचा आ
शिरवाद घडावा. अशा गोष्टी पाहिजेत. असें असून आ
पण मनांत आणतां हें कसें घडेल. वडिलांनीं मिळ-
विलेली संपत्ती जाऊन अपेश येईल. असें दादोजीनें
उत्तर केलें. यानंतर दादोजीनें मसलत करण्याचीं जी
जी लक्षणें व गुण सांगितले ते शिवाजीचे मनांत ठस-
ले. आणि त्यांचे (दादोजीचे) उपदेशामुळें शिवाजी-
चा निश्चय कमी न होतां त्यांणीं आपला हेतु सिध्दीस-
जावा यासाठीं उद्योग चालविला. ही गोष्ट शके १५६३
सन १६४१ इसवी या वर्षी झाली.

पुढें कांहीं थोर झाल्यावर शके १५६३ सन १६४१
इसवीचे सुमारें शिवाजीनीं मावळेलोकांवर प्रीती करू
न त्यांस शिकारीचे कामांत वागवून त्या लोकांस डोंग
रीकिल्ल्यांची माहिती करून दिली. त्या लोकांत एसजी
कंक, दुसरा तानाजीमालुसरा, तिसरा बाजीपासल
कर शिवाजीचे बाळमित्र होते ते वश होतांच कांहीं ल
श्कर घेऊन तोरणा किल्ला प्रथम घेऊन कांहीं दिवसां
नीं त्याची दागदुजी केली. त्यांत एके दिवशीं जगदीश्व

र कृपेनें एक हांडा मोहरांनीं भरलेला सांपडला.

त्या नंतर शिवाजी महाराज यांणीं विजापुरास व कील पाठवून बादशाहा यास समाजाविलें कीं मी किल्ला घेतलाआहे हा आपले राज्यधानीपासून दूर आहे आ णि एथील लोक फार उत्पाती आहेत यासाठीं ही जागा विश्वासू सेवकाकडे असल्यानें बंदोबस्त राहील. त्या जवरून किल्ला त्याजकडे असावा अशी विजापूरचे-बादशाहाची आज्ञातर झालीनाहीं. पण विजापूरचे दर बारचे लोक शिवाजीस कांहीं अनुकूळ असल्याच्या-योगानें पुन्हांही गोष्ट बादशाहाचे दरबारीं निघाली नाहीं.

नंतर दारूगोळीची तयारी करून शके १५६९ सन १६४७ या वर्षी तोरण्या नजीक आग्नीये दिशेस,मोर वर (दुर्गा देवीचा डोंगर) दीड कोसा वर चांगला पाहून दुस-रा राजगड बांधण्यास आरंभ केला ती विजापूरचे बा दशाहा यास खबर कळून किल्ला नबांधण्या विषयीं म नाई पाठविली. दादोजी कोंडदेवही वारंवार सांगत होते कीं हे नीट नाहीं; परंतु ती गोष्ट शिवाजीनीं ऐकली नाहीं. राजगड किल्ला तीनमाच्या सुवेळा, सजिवनी, पद्माव ती असे बांधून किल्ला बांधला

नंतर दादोजी कोंडदेव यांस वारधक्य प्राप्त होऊन

मरण पावले. त्यांणीं अंतकाळा पूर्वी शिवाजीराजास-बलावून सांगितलें कीं मी आपल्यास हिताविषयीं निषेध करीतहोतों त्याची क्षमा असावी. आपण स्वतंत्रपणें वागोन मुसलमानापासून हिंदूचीं देवस्थानें राखून गाई ब्राह्मण व प्रजेचा प्रतिपाळ करावा. इतकें बोलून दादोजीकोंडदेव यांणीं प्राण सोडला

या संधींत शाहाजीमहाराज यांणीं दादोजीपंतास द्रव्य जमा झालें असेल तें पाठवावें ह्मणून लिहिलें नोंतेवारले. नंतर महाराजांनीं उत्तर पाठविलें कीं एथे खर्च वाढला आहे. याउपरखर्चास खजीनाआणविणें तो कर्नाटकप्रांतांतून आणवावा. इकडून पाठवीत नाहीं असें लिहिलें. त्याजवरून सर्व आटोप पुत्रांनीं केला. अचाट कर्मे करूंलागले. द्रव्य व मुलूख याचाच आहे ह्मणोन संतोष मानिते झाले. आणि तेथें विजापुरीं राहणें ठिकनाहीं ह्मणोन चंजाउराकडे जाण्याची मसलत काढून ते (शाहाजी) तिकडे गेले.

नंतर शिवाजीराजानीं आपले पित्याचे जाहगिरीचा वसूल पित्याचे नांवें घेऊंलागले. आणि त्या जाहगिरींत चाकणकिल्ला त्यावरचा फिरंगोजी हा आपणास अनुकूल झाल्या वर त्याजला माम-

लतीची सनद दिली. सुपेपरगण्याचा मामलेदार बा
जिमोहिते अनुकूळ होऊन वसूल देईना सबब त्याचे
कामगारासहित त्याजला धरून कर्नाटकांत शाहाजि
कडे पाठविलें. आणि चाकणाचा किल्ला व सुपेपरगणा
आपले सत्तेंत आणला.

खेरिज कोंडणा किल्ला घेऊन त्याचें नांव सिव्ह
गड ठेविलें. व पुरंदरकिल्लाही घेतला. आणि तेथील
लोक आपले चाकरीस ठेविले. नंतर युक्तीनें युध्द के-
ल्यावांचून चाकणकिल्ला व निरानदी या दोहोंमधील-
मुलूख घेतला.

नंतर कालियानीचा सुभेदार याणें मोठा खजिना
विजापुरास पाठविला तो शिवाजीनें वाटेंत छापा घा
लून सर्व द्रव्य हरण केलें. आणि पुढें कांगोरी, तुंग, ति
कोना, मोरप, कुवारी, लोहोगड, राजमाची हे सातकि
ल्ले व तळेघोसाळे आणि रेडी हे दोनकिल्ले कोकणचे-
घेऊन गांव लुटून द्रव्य राजगडास नेले. व कालिया-
नीचा सुभेदार कैद करून किल्लेसही केले. आणि देव-
स्थानाचे व ब्राह्मणास जें पूर्वी दिलेलें सर्व चालविलें

शिवाजीमहाराज कोकणांत गेले तेव्हां हरिहरेश्व
राचें दर्शन करून निकडून येतांना गोवळकर सावं-

वंत येऊन भेटले त्यास चाकर ठेविलें. त्याजपासून-तीनशें होनाची तलवार नामांकित होती ती तीनशें होन व पोषाख देऊन घेतली. तिचें नांव भवानी असें ठेविलें. ती तलवार शिवाजीपाशीं आल्यावर बहुत यशस्वी जाहली तिची पूजा नित्यनेमानें करूं लागले.

नंतर शिवापूर व पुणें एथें आंबराई लाविली. शिवापूर एथील आंबराईस आपले वडिलाचें नांव शाहाबाग असें नांव ठेविलें. व त्याजवर रायगड, हपशी याजकडे होता तो भेदें करून घेतला. ही गोष्ट शके १५६९ सन १६४७ या वर्षी झाली.

हें वर्तमान विजापूरचा बादशाहा महमद अलीशाहा यांस कळतांच शिवाजीला मनाई पत्र पाठविले. व शिवाजीचे तीर्थरूप शाहाजी यांचे ऐश्वर्य कर्नाटकांत-फार वाढलें होतें ते आपले लेकास अनुकूळ असतील असें समजून त्याजला बाजी घोरपडे सरदार मुधोळकर यांजकडून कैद करून शके १५७१ सन १६४९ इसवी या वर्षी बादशाहानें आपले जवळ नेऊन आज्ञा केली कीं लेकाचें बंड तुह्मी मोडावें, त्याणीं उत्तर केलें कीं, शिवाजी माझें ऐकत नाहीं; परंतु तें त्याचें बोलणें पादशाहास खरें न वाटतां शाहाजीला चिरेबंदी कोठडींत घालू

न वारा जाणें पुरतें छिद्र मात्र कोठडीस ठेविलें. आणि सां-
गितलें कीं या अपराधाची क्षमा मागण्यास शिवाजी-
लौकर नयेईल तर छीद्र बंद होईल.

हें वर्तमान शिवाजीराजास कळल्या वर त्याचे मनां-
न क्षमा मागण्यास जावें असें आलें. परंतु त्याची स्त्री
सईबाई याणीं विजापूरसरकारचा विश्वास धरूंनये अ-
शी सल्ला देऊन जाऊं दिलें नाहीं. नंतर शिवाजीनीं दि-
ल्लीचा बादशाहा शाहाजहान यास आपले बापाची सुट-
का विजापूरकराकडून करवावी असें पत्र पाठविलें त्या-
प्रमाणें दिल्लीहून विजापूरास सूचना झाली असेल व
विजापूरसरकारचा दिवाण मुरार पंत याचें व शिवाजी-
चें इष्टत्व होतें या योगानें शाहाजीस कोठडींतून काढून
किल्ल्यांत ठेविलें.

त्या पुढें चार वर्षे शाहाजी विजापुरीं कैदेंत होते तों
पर्यंत शिवाजीनीं कांहीं बंड केलें नाहीं. नंतर कर्नाटकांत
बंड झालें त्याचे बंदोबस्ता करतां बादशाहानीं शाहाजी
भोसले यास कैदेंतून मुक्त करून पाठविलें.

हें वर्तमान शिवाजीस कळल्या वर निराव कोय-
ना नदीचे काठीं आपला मुलूख होता त्याचें संरक्षण-
होण्यासाठीं आपला मुख्यकारभारी शामराजनिळकं-

त्यास ठेवून त्यास पेशवेपद देऊन फौजेची सरदारी दि
ली. व जावळी परगण्याचा राजा याशीं लढायी करून त्या
स ठार मारून त्याचा परगणा घेतला. व रोहिडाकिल्लाही घे
तला.

खेरिज शके १५७९ सन १६५७ इसवी या वर्षी मोग-
लाचे राज्यांत शिवाजी उपद्रव करूंलागले. आणि दिल्ली
चे बादशाहाचा पुत्र अवरंगजेब हे विजापूरकराशीं लढूं ला
गले तेव्हां त्याजला शिवाजीनें नम्रपणें पत्र पाठविलें. त्यांत वि
जापुरकराचा मुलूख आह्मी घेतला आहे त्याची सनद आ
पण द्यावी असें लिहिलें त्या प्रमाणें त्याणें सनद देऊन खे-
रीज दाभोळ व त्या खालचा मुलूख दिल्लीसरकारचा अ-
सून विजापूरकर उगीच सत्ता करतात तरी तोहि घ्यावा अ
शी आज्ञा केली.

नंतर शिवाजी हे मोगलाचे मुलखांत जाऊन जुन्नर-
शहर लुटून त्यांत दौलत फार सांपडली ती राजगडास पो
चविली. व नगरचे लुटींतही हत्ती घोडे वगैरे दौलत फार सां
पडली. त्या पुढें आणखीं औरंगजेबास नम्रतेचें पत्र लि-
हिलें. आणि वकिला बरोबर सांगून पाठविलें कीं मी आपले
चाकरीकरतां पुष्कळ स्वारजमा केले आहेत तेव्हां औरंग
जेब दुसरे कामाचे वेधांत असून त्याणीं त्या अन्वयें मान्य

केलें.

इतक्यांत समुद्रतीरीं शिवाजीनें किल्ले घेतले. आणि सर्व कोंकणपट्टी घेण्याचें मनांत आणून त्याकामावर शामराजपंत पशवे यांस नेमिलें. त्याशीं फत्तेखान यांणीं लढायी करून पेशव्याचा पराभव केला.

नंतर शामराजपंतास शिवाजीमहाराजांनीं माघारी आणून त्याचा अधिकार मोरोत्रिंबक पिंगळे यास दिला तो मोरोत्रिंबक फार चतुर शूर सरदार होते.

या खेरीज दुसरे कामगार मुलखाचे बंदोबस्ताकरतां केले ते.

१ माणकोजीसरनोबत. ३ सोनोपंत डबीर.
२ बाळकृष्णपंत मजमदार. ४ रघुनाथ बल्लाळ सबनीस.
पुढें निळोसानदेव. ५ गंगाजी नागोजी वाकनीस.

एणें प्रमाणें कामकाजाचा बंदोबस्त ठेविलाहोता.

नंतर विजापूरचे दरबारांत असें ठरलें कीं शिवाजीचें बंड अवश्य मोडलें पाहिजे. या साठीं स्वार ५००० व पायदळ ७००० व कितीएक तोफा व जेजाला नेमून त्याचे सरदारीचें मुख्यत्व अफजूलखानाला देऊन शिवाजीचे पारिपत्यास रवाना केला. त्यासरदारानें गर्वानें अशी प्रतिज्ञा केली कीं शिवाजीस बांधून आणून स्वामीचे सिंहासनाचे

पायरीवर आणून टाकीन. अशी प्रतिज्ञा करून ते अफ
सूलखान शके १५८१ सन १०६९ फसली यावर्षी लश्कर
सुध्दा पंढरपुराहून वाईस आले. हें वर्तमान शिवाजीरा
जे यांस कळतांच शिवाजीराजे प्रतापगडावर जाऊन रा
हिले. त्या पूर्वींच त्यांणीं पारघाटचे पाठीमागें डोंगर होता;
त्याचा किल्ला मोरोत्रिंबक पिंगळे याचे हातून बांधून त्या
किल्ल्याचें नांव प्रतापगड ठेवून तेथें आपले कुलस्वामीदे
वीची स्थापना केली आणि त्या संस्थानाचें काम मोरो
त्रिंबक पिंगळे यास दिलें. त्या वेळेस किल्ल्याकडे उत्पन्न प
न्नास हजार पर्यंत प्रतिवर्षी असोन पिंगळे याचे जाती
कडे त्यांतून पंचवीसहजारापर्यंत पोंचत होतें त्या संस्था
नचें काम हल्लीं पिंगळे याचे वंशांतील बहिरोनारायण-
याजकडे चालत आहे. नंतर शिवाजीनी प्रतापगडाहून-
एक वकील अफसूलखानाकडे पाठवून बोलणें फार नम्र
तेचें स्तुतियुक्त लाविलें कीं तुह्मी मोठे प्रतापी आहां. तेव्हां
त्यास माझी लढायीची शक्ती किती आहे. तुमचे योगें
पातशाहा ही क्षमा करील तर तुह्माला सर्व मुलुख देईन;
त्यावरून सरदाराचें मन प्रसन्न काहीसें झालें. आणि-
गोपिनाथपंत या नावाचा कोणी एक आपला कारकून बो
लण्यास पाठविला. तो पारगांवास पोंचल्या वर शिवा-

जींनी भेटीसाठी किल्ल्यावरून उतरून भेट घेतली त्या वेळेस शिवाजीनीं त्याबरोबरचे लोकांसुध्दा सन्मान करून राहण्यास जागा वगैरे सरबरा केली. आणि रात्रौ कोणासनकळतां गोपिनाथपंताची गांठ घेऊन सांगितलें कीं आह्मास श्रीभवानीमाता देवीची प्रसन्नता होऊन आज्ञा झाली आहे कीं तूं गाई ब्राह्मणाचा प्रतिपाळ कर. त्यावरून या कर्मास आह्मी प्रवृर्तक आहों. त्यास तुह्मी अनुकूळ व्हाल तर तुह्मास हिवरेगाव जहागिर करून देईन त्या वरून तो ब्राह्मण वश होऊन निष्कपटपणाबद्दल शिवाजीस शपथ दिली. आणि उभयतांचे विचारें ठरलें कीं अफसूलखानास मसलत करावयास ह्मणून आणावें. नंतर गोपिनाथपंता बरोबर कृष्णाजी भास्कर देऊन पाठविलें. त्यांणीं अफसूलखानास जाऊन सांगितलें कीं शिवाजी तुह्मास फार भितात. तुह्मी अभय द्याल तर ते आपले स्वाधीन विश्वासें करून होतील. ते ऐकून अफसूलखान गोपिनाथपंताचे सांगण्या प्रमाणें वागूं लागला. शिवाजीनीं मोरोपंत व नेटाजी पालकर व पुष्कळ मावळे लोक आणून प्रतापगड व जावळी या दोन जागीं गुप्त ठेविले होते. अफसूलखान भेटीची तयारी करून दीड हजार फौज घेऊन प्रतापगडा जवळ आला;

तेव्हां गोपिनाथपंतानें शिवाजी भियेल असें सागून: फौज मागें ठेवून एक हत्यारबंद बरोबर घेऊन अफसूलखानास भेटीचे जागीं आणून बसविले. शिवाजीनी स्नानसंध्या नित्यकर्म उरकून मातेचे चरणीं मस्तक ठेवून आशिरवाद घेऊन आंगांत चिलखत चढवून उजवे अस्तनींत गुप्त बिचवा शस्त्र ठेविलें. आणि डाव्या हातीं वाघनखें घेऊन भेटीस निघाले. त्याचे बराबर तानाजी मालुसरा ही निघाला. तो हत्यार बंद होता. त्यासही गोपिनाथपंतानें काहीं मागें ठेविलें नंतर शिवाजी व अफसूखान भेटतां भेटतां शिवाजीनें अफसूलखानाचे पोटांत वाघनखें खुपसली. तीं बळकट लागलीं इतक्यांत तो त्वरेनें दूर होऊन तरवार उपसून, वार करून मोठा घात आहे असें बोलला. त्याच वेळेस शिवाजीनीं आपले अस्तनीतला बिचवा काढून अफसूलखानास ठार मारलें त्याणें वार केलेला शिवाजीस चिलखता मुळें लागू झाला नाहीं. अफसूल खाना बरोबर आलेला हत्यारबंद सयदबंधू आपल्या धन्याजवळ आला. त्याचे हातची तरवार शिवाजीनें घेतली: आणि त्याज बरोबर लढूं लागले. व त्यास तुला जीवदान देतों असे कितीएक वेळ बोलले तें त्याणें न ऐकतां इमानदारीनें धन्यासाठीं लढतांच त्यास ही ठार मारलें. त्यासमयीं शिवाजीचे लो-

कांनीं येऊन अफसूलखानाचें शीर कापून किल्ल्यावर नेलें पुढें संकेता प्रमाणें तोफांचा बार केला तो एकाएकीं प्रतापगड व जावलीचे गुप्त लोकांनीं ऐकून ते सर्व लोक येऊन अफसूलखानाचे लश्करावर छापा घालून त्या लश्कराचा फार नाश केला. त्या वेळेस शिवाजीस घोडे ४००० व कांहीं हत्ती व उंट आणि बहुत द्रव्य व तोफा व जेजाला वगैरे पुष्कळ सरजाम सांपडला. त्या छाप्यांत कितीएक लोक धरून नेले. जे गेले त्यास जाऊं दिलें. व अफसूलखानाची स्त्री व पुत्र सांपडली ती शिवाजीनें आपला सरदार खंडोजी काकडा याचे हवालीं केली. त्याणें त्यांजपासून लांच खाऊन सोडून दिली. सबब त्या काकड्यास ठार मारला. या लढायींत जे लोक शूरपणानें लढले व जखमी झाले त्यांचा सन्मान करून अलंकार वस्त्रें दिलीं त्या योगें शिवाजीची कीर्ति होऊन शिपायीलोक युध्दास तयार राहिले. गोपिनाथपंतास संकेता प्रमाणें हिवरेगांव देऊन सन्मान केला. आणि सरदारीचा अधिकार देऊन आपले जवळ चाकरीस ठेविले.

नंतर शिवाजीनी पन्हाळा किल्ला घेऊन कृष्णातीरची खंडणी घेतली. खेरिज कोंकणचे व सह्याद्रीचे किल्ले हस्तगत केले. रांगणा व खेळणा हे दोन किल्ले युध्द करून घेतले. त्यापैकीं खेळण्याचें नाव विशाळगड ठेविलें. तें अद्याप चालत आ

हे हें वर्तमान विजापुरास कळलें. नंतर त्या बादशाहानें आपला सरदार रुस्तुमखान होता त्यास कोलापूरचे बंदोबस्तास नेमिलें व त्याज बरोबर स्वार ३००० आणि कांहीं पायदळ होतें तो पन्हाळ्याजवळ येतांच शिवाजीनीं आपले स्वार जमा करून त्यांचा पराभव करून त्याजला कृष्णेपार माघारा घालविला. आणि पायदळ जमा करून विजापूर पर्यंत खंडणी घेऊन माघारी विशाळगडास येऊन कोकणांत राजापूर व दाभोळ हीं दोन्ही लुटून बहुत द्रव्य राजगडीं नेलें.

हें शिवाजीचें कृत्य विजापुरी बादशाहास कळल्यावरून एक कट करून एक जोहार सिद्दी होता त्याज बराबर अफसूलखानाचे दुप्पट फौज देऊन शिवाजीचे पारिपत्यास नेमिला त्याचे हातून ही कांहीं एक न होतां उलटे शिवाजीनें आपल्या कामगारांच्या टोळ्या करून त्यासच उपद्रव केला.

नंतर विजापूरचे बादशाहा स्वतः फौज घेऊन कराडास आले. त्यांणीं कितीएक किल्ले घेतले. व शिवाजीनीही श्रृंगारपूर वगैरे युध्द करून घेतले.

नंतर शिवाजीनीं श्रीरामदास स्वामीचा गुरुपदेश घेऊन स्वामीची कृपा संपादन केली. व प्रतापगडावर कुळस्वामी देवीची स्थापना केलीच होती त्या देवीचीही प्रसन्नता

करून घेतली. त्यायोगें कर्नाटकांत बंडें उत्पन्न झालीं. त्याचे बंदोबस्ताकरतां बादशाहास माघारे जावें लागलें. त्याणीं परतजानांना वाडीकर सावंत याचे कुमकेस बाजी घोरपडे मुधोळकर व बालोलखान यास देऊन तिघांस शिवाजीस जिंकण्याविशीं सांगितलें.

हें वर्तमान शिवाजीस कळतांच त्याणीं कांहीं लोक बराबर घेऊन चोरवाटेनें फार जलदीनें जाऊन मुधोळावर छापा घालून मुधोळकर व त्याचे कितीएक भाऊबंद मारून गांव जाळून लुटून परत माघारे आले.

नंतर शिवाजीनीं शके १५८४ सन १६६२ इसवी या वर्षीं मोठें सैन्य जमा करून पायदळाचे सरदार मोरोपंत पिंगळे व स्वारांचा सरदार नेताजी पालकर यास करून जुनराचे उत्तरेकडील कितीएक किल्ले पिंगळे याणीं घेतले. व पालकर याणें अवरंगाबादपर्यंत मोंगलाचे मुलखांत लुटालूट करून पुण्यास माघारा आला.

हें वर्तमान दिल्लीचा पादशाहा अवरंगजेब यास कळतांच त्याणीं शाईस्तेखान सुभेदार यास शिवाजीचे मुलखीं जाऊन त्याचा मुलूख घेण्याची आज्ञा केली. त्यावरून त्याणें येऊन पुणें व जुन्नर किल्ला घेतला. जुन्नर किल्ला घेते वेळेस शिवाजीकडील फिरंगोजी नरसाळा किल्लेदार याणें मोंग

पराक्रम केला. आणि आपले धणी शिवाजीयांस मिळा ला. नंतर आणखी मागाहून शाइस्तेखानाचे कुमकेस-जोतपूरचे राजे एशवंतसिंग फौजेसह पाठविले. त्यादोघांस शिवाजीनीं पुष्कळ शूरत्व दाखविलें. आणि माघारें हटविलें. कितिएक वेळां त्या मुसलमानांचा पराभव-केला. नंतर औरंगजेब बादशाहानें शाईस्तेखानाची ब-दली करून त्याचे कामा वर सुलतान माजूम सुभेदार-यास नेमिला.

नंतर शिवानीं लश्कर जमा करून चारहजारस्वारानिशीं सुरतेस जाऊन लुटालूट करून सहा दिवस पर्यंत स्वस्थपणें द्रव्य नेऊन रायगडीं ठेविलें. इतक्यांत त्याजला आपले तीर्थरूप कर्नाटकांत शिकारीस गेले-असतां घोड्या वरून पडून मृत्यू पावल्याचीखबर लाग ली नंतर त्याची क्रिया सिद्धगडावरकरून मग आपले रा जगडास जाऊन आपले राज्याचा बंदोबस्त करीत कांहीं दिवसराहून आपले नांवास राजा असें पद जोडून आप-लेनांवें शिक्काचालवूं लागले. हें वर्तमान शके १५८६ सन् १६६४ वर्षी झालें. आणि त्याच सालीं शिवाजीनीं अहम-दनगरचीपेठ लुटून औरंगाबादेसभोंवतालीं धामधूम करू नहोते तों मागून विजापूरचे दोन सरदार येऊन कोंकणप

टी घेण्याविषयीं फार यत्न करीत होते; त्याजवर फौजे सहित शिवाजीराजे येऊन त्या सरदाराची दुर्दशा केली; त्या समयीं अकस्मात शिवाजीराजे जागोजाग प्रगट होतात; या वरून ते असंख्य रूपें धरितात कीं काय अ सा सर्वलोकांस भास झाला. आणि शिवाजीचे लढाऊ गलबतांनीं कितीएक दुसरीं गलबतेंवमोंगलाचे जहाजा वर बसून मकेस जाणारे लोकांस लुटून बहुत द्रव्यें ज- मा केलीं. व मालवणा पाशीं गोव्याचे दक्षिणेस साठ सत्तरकोशांवर बालशिलोर या गांवीं लूट करून पुष्क ळ द्रव्य घेऊन तेथून महाबळेश्वरीं शिवाजीराजे आले

पुढें शके १५८७ सन १६६५ इसवी या वर्षी शिवा जीनें मलबार प्रांतीं स्वारी करून सुरतशहर लुटलें; ते वेळेस फौज १५००० नेलीहोती. त्या समयीं बहुत द्र व्यानें भरलेले हुबळीशहर लुटलें; त्यांत लुट मिळाली- इतकी कधीही लूट मिळालीनव्हती.

त्या पुढें औरंगजेबास मकेसजाणारे लोक शिवा जीनें लुटलेहें समजताच फारराग येऊन त्याचे पारिपत्या स एकराजा जयशिंगरजपूत, दुसरा दिलिरखान, आ फखान, हे दोघे सरदार मोठी फौज देऊन पाठविले. ते सरदार मोठे प्रबळ होते. त्याणीं येऊन पुरंदर व सिंह

गड व पुण्यास घेरा घातला. ही खबर रायगडास शिवाजीस लागली नव्हती; पुरंदरचे किल्लेदार धैर्यानें लढत होते. व बाजी परभू महाडचा देशमूख याणें मावळे व हेटकरी, लोक जमा करून, दिलिरखानाशीं फार मोठें युध्द करून दिलिरखानाचे लोक ठार मारले. तेव्हां दिलिरखानानें त्या मावळे लोकांचे सरदारास तीर मारून ठार मारिला; परंतु किल्लेदारांनीं किल्ला दिला नाहीं.

राजा जयशिंग मोठा विख्यात अशी कीर्ती, त्याज जवळ फौज फार होती; आणि तो एकाएकीं आला; या मुळें शिवाजीकडील मानकरी वगैरे भय पावले; हें जाणून शिवाजीनीं त्याजयशींगाशीं सल्ल्याचें बोलणें लाविलें; आणि शके १५८७ सन १६६५ या वर्षी थोडकेसे लोक बरोबर घेऊन जयशिंगराजाच्या लश्करांत शिवाजीमहाराज पोचले. तेव्हां जयशिंगानें शिवाजीराजाचा फार सन्मान केला. व दिलिरखानयाशीं ही सलोखाच केला. आणि त्याचे हवालीं पुरंदर-किल्ला केला; त्या वेळेस असें ठरलें कीं, मोंगलाचे मुलुख जे शिवाजीनें घेतले ते परत द्यावे, व विजापूर सरकारचे बत्तीस किल्ले घेतले त्यापैकीं वीस मोंग-

लास द्यावे. बाकी बारा किल्ल्यांची जाहगिर दिल्लीहून शिवाजीराजासकरून द्यावी. व शिवाजीचे पुत्र संभाजी आठवर्षांचे होते; त्यास पांचहजारस्वारांची मनसब द्यावी; असें ठरून कलह वाटला नाहीं. आणि अवरंगजेबास शिवाजीनें नम्रतेनें पत्र पाठविलें कीं विजापूरचे बादशाकडे जो मुलूख आहे. त्यांत चवथाई आणि सरदेशमुखीचा दहावा अंश मला द्यावा; या दोन्हींचें उत्पन्न पांचलक्ष होणारें आहे; त्यांतून वर्षास तीन लाख होन आपल्यास स्वामित्व देईन असें कबूल केलें; तेव्हां औरंगजेबाचे मनांत ही विजापूर बुडवावें, असें होतेंच. ह्मणून त्याणें शिवाजीला फौजेसह अनुकूळ व्हावें; असें जयशिंगास पत्र लिहिलें. त्या प्रमाणें उभयतां विजापुराकडे चालले.

उभयतां बरोबर विजापूरचे सरदार याणीं फौजेसहित येऊन मोठी शर्तीची लढायी केली. त्यावेळेस शिवाजीव त्याचा सरदार नेटाजी पालकर यांणीं मोठा पराक्रम केला. हें वर्तमान औरंगजेबास कळल्यावर प्रसन्न होऊन शिवाजीस बहुमानाचीं वस्त्रें व स्तुतीचें पत्र पाठविलें; आणि मागाहून दुसरें पत्र पाठविलें त्यांत तुह्मी येऊन भेटावें; तुमचा मोठा सन्मान होईल. व परत जाण्यास अडचण-

पडणारनाही. असें लिहिलें.त्यावरून जयशिंगाचे म सलतीनें दिल्लीस जाण्याचा निश्चय करून आपल्या साऱ्या किल्ल्यांचा बंदोबस्त केला. आणि रायगडीं सर्व मानकरी जमा करून आणि आपण तेथें येऊन मोरोत्रिं बक पिंगळे व आबाजी सोनदेव व आनाजी दत्तो यातिघां स आज्ञा केली कीं, आह्मी दिल्लीहून परत जाऊन येईपर्यंत् तुह्मी मुख्यत्वें कारभार करावा; असें सांगून आपला पुत्र संभाजी यास बरोबर घेऊन शिवाजीराजे पांचशें स्वार व एक हत्तीर मावळे लोक इतक्यासहित शके १५८९ सन् १६६७ या वर्षी निघून दिल्लीजवळ गेले, तेव्हां बादशाहा नीं आपण न जातां दोन सरदार सामोरे पाठविले व भेट झा ल्यावर बादशाहानें शिवाजीस सरदारांचे ओळींत बसवि लें तेव्हां त्याजला राग येऊन कांहीं दुर्भाषण केलें तें बादशा हास कळल्यावर शिवाजीनीं पुनः दरबारास येऊं नये, अ सा निरोप पाठविला. मग शिवाजीनीं औरंगजेबास विनं- ती केली कीं माझें चाकरीचें कारण नसेल तर माघारे जातो, त्यावर कांहीं उत्तर न देतां शिवाजी राजे यांचे राहण्याचे हवे- लीस भोंवतीं चवकी बसविली. नंतर शिवाजी राजानीं पुनः विनंती केली कीं, मजबरोबरचे लोक तरी माघारे जाऊं द्यावे तें बो लणें सरकारांत मान्य होऊन लोक जाण्यास हुकूम दिला, शिवा

जीचे चिरंजिवा सहित तेथें राहिले. त्यांणीं दरबारांत मोठे मोठे सरदाराशीं नजराणा देऊन स्नेह करून आपल्यास तुवरणाईतपणा दाखविला. आणि देवब्राह्मण, फकीर वगैरे यास बहुत धर्म केला. आणि मिठाया भरून पेटारे नजर पाठविण्याचा पाठ चालविला. आणि एके दिवशीं आपण व चिरंजीव असे दोघे पेटाऱ्यांत निजूनते पेटारें माणसाकडून शहराबाहेर नेले. आणि पेटाऱ्यातून बाहेर निघून एका घोड्यावर दोघे बसून गुप्तरूपें मथुरेस जाऊन एक ब्राह्मणाचे घरीं मुलास ठेवून आपण गोसाव्याचा वेष धरून माघारे रायगडास आले. तेथें आपणास सर्व गोष्टी अनुकूळ आहेत असें मनांत आणून-स्वस्थ राहिले. त्या वेळेस जयशिंगानें विजापुरास वेढा घातला होता, त्याचा पराभव होऊन फार नाश झाला. त्याचे बदलीवर पुन्हां सुलतान माजूम सरदार नेमिला आणि जयशिंग दिल्लीस माघारें बोलविला तो जातांना-वाटेंत मृत्यु पावला.

या सुलतान माजुमास शिवाजीनीं द्रव्य खर्चून वश केला. आणि त्याचे हातून बादशाहास लिहून पाठविलें, त्यांत चाकरीची कबुलायत लिहविली, त्यावरून बादशाहानें राजा असें पद देऊन पुणें व चाकण व सुपे परगणा व वरा

ड प्रांतांत एक जाहगिर या प्रमाणें दिले. व पुत्र संभाजी-
यास मनसब देऊं केली होती, ती दिली.

शके १५९० सन १६६८ या वर्षी शिवाजीराजास खंडणी वीजापूरसरकारानीं तीन लाख, व गोवळकोंडच्या बादशाहाची पांच लाख, या प्रमाणें प्रतिवर्षी देऊं; असे करार होऊन चालू झाली.

नंतर शिवाजीराजानीं दोन वर्षे आपले राज्याचे वसूलाचे व लश्करचे वर्तणुकीचे वगैरे कायदे नवे करून पूर्वी मिळालेलें द्रव्य आपण घेतल्या किल्ल्यावर नेऊन ठेवून प्रतिवर्षी दसऱ्यास समारंभ करून फौजेची हजिरी घेणें व सरसालचा जमाखर्च पाहण्याची वहिवाट चालविली; तेणेंकरून त्याची प्रशंसा मोठी झाली. व त्यावेळेस कामगार केले ते,

१ पेशवा मुख्यप्रधान. मोरोत्रिंबक पिंगळे यांणीं सर्व चौकशी करावी.

२ मुजूमदार आबाजी सोनदेव यांणीं जमाबंदी व खर्चाची चौकशी करावी.

३ फडनीस आनाजीदत्तो यांणीं दप्तर संरक्षण करावें.

५. सरनोबत २

१ स्वारांचे काम प्रतापराव गुजर.

१ पायदळाचें काम येसाजी कंक.

—

६. सोमनाथपंत डबीर. यांणीं परराज्यांतील चौकशी व-

व सनदांची बारनिशी. बोलणें करावें.

४. वाकनीस दत्ताजी त्रिमळ यांणीं खासगी शिबंदीव दसरचें काम करावें.

७. न्यायाधिश निराजीरावजी. यांणीं इनसाफ करावा.

८ न्यायाधिश शभूशास्त्री प्रथम. नंतर रघुनाथराव केले.

या प्रमाणें अष्टप्रधान कले. चिटणीस बाळाजी-आवजी परभू फार चतूर होता, तो केला व बाळकृष्णपंत हणवंते फडणीस केले. शेषापानाईक वांभार गोंदेकर यांस मालोजीराजे यांचे पूर्वीचे वचना प्रमाणें जामदार केलें. या प्रमाणें करून हे तीन कामगार निरंतर जवळ होते.

नंतर सिंव्हगड वगैरे बहुत किल्ले युध्द करून शिवाजीनीं हस्तगत केले. मोंगलाचे लोक धरावयास आलेत्याचा पराभव केला. असा दिवसेंदिवस जय फार झाला. खानदेश लुटून वऱ्हाडाची चौथाई प्रतिवर्षी घेतजावी, असें ठरवून आवडा व सालहेर हे दोन किल्ले घेतले. नंतर अवरंगजेबानीं दक्षिण देशांत मोहोबतखान दुसरा सरदार पाठविला त्याबराबर मोठी फौज दिली. हें वर्तमान शिवाजीराजास कळतांच मोरोपंत व प्रतापराव गुजर याजबरोबर वीस हजार फौज देऊन त्यावर लढायीस पाठविलें.

त्यांणीं युध्द करून मोंगलाचे फौजेचा अतिनाश केला. शिवाजीराजाचे फौजेची मर्दुमकी अति विख्यात झाली.

नंतर शके १५९५ सन १६७३ या वर्षी शिवाजीराजानीं सैन्य जमा करून विजापूरचा बादशाहा अबदुलमहमद मरणपावतांच त्याकडे स्वारी करून पन्हाळा किल्ला घेऊन-हुबळीशहर आनाजीदत्तो यांजकडून लुटवून असंख्य द्रव्य-मिळविलें. व परळी किल्ला घेतला. व सातारा किल्ला व चंदनवंदन व नांदगिरी व पांडवगड व तायकड असे किल्ले हस्तगत-केले. व अबदुलकरीम विजापुराहून फौज घेऊन आला, त्याचा पराभव शिवाजीराजाचा सरदार हासोजीमोहिते यांणीं केला. त्या मोहित्याचे लोकांत संताजीघोरपडे व धनाजीजाधव मोठे विख्यात होते, त्या वेळेसच आबाजीसोनदेव मेले. त्याची मुजूमदारी त्याचा लेक रामचंद्र आबाजी यास दिली.

या नंतर बहुतकरून दक्षिणप्रांत व कर्नाटक चंजाऊर वगैरे प्रांत व किल्लेकोट हस्तगत केले. व मांडलिकराजे व पाळेगार सर्व खंडणी देऊलागले. विजापूर बादशाहात हस्तगत जाहली. भागानगरचे पातशाहानीं तह केला. दौलताबादशाईंतील कित्येक सुभे प्राप्त झाले. ध। सुभे दक्षिणप्रांत राज्य बहुतकरून हस्तगत झालें. व राहिलें त्यांत चौथाई मोकासा आबादी साबात्रा निमेंअम्मल स्वराज्य जाहला. एक दिल्लीचें राज्य

मात्र स्वसत्तेंत येणें राहिलें तें ही सत्तेंत येईल, असें शिवाजी महाराजांचे मनांत येऊन आपण असेंच राज्य करणें, हे पाळेगारांत संख्या धरतात, याजकरितां क्षात्रधर्माप्रमाणें राज्याभिषेक करून सिंहासनाधिश्वर व्हावें, छत्रपतीक्षत्रीय कुलावतंस राजा असें ह्मणवावें राज्यनीतीनें राज्य चालवावें, ह्मणोन महाराजानीं निश्चय करून आपले पदरी लोक, सरदार, कारकून, महाल, किल्ले, कारखाने, मुलूख, माणसें आपले सत्तेंत किती आहेत, यांची निवड केली, त्यांतून मुख्यांची नांवें खालीं लिहिलीं आहेत.

| कारकून व मुत्सदी वगैरे. | | |
|---|---|---|
| १ मोरो त्रिंबक पिंगळे. | २२ | दत्ताजी गोपिनाथ वाकील. |
| २ रामचंद्र निळकंट. | २३ | आनाजी रंगनाथ केळकर. |
| ३ रघुनाथराव पंडित. | २४ | विठ्ठल दिनदेव गरुडकर. |
| ४ अंणाजी दत्तो. | २५ | कोनेहरपत. |
| ५ जनार्दन पंत हणमंते मजमदार. | २६ | शिवभट उपाध्ये. |
| | २७ | शिवाजी शंकर. |
| ६ दत्ताजी पंत वाकनीस. | २८ | कृष्णाजी पंत. |
| ७ बाळाजी सोनदेव. | २९ | मथुरे. |
| ८ निराजी रावजी. | ३० | काशीपंत मथुरे. |

| | |
|---|---|
| ९ मल्हाद निराजी. | ३१ विश्वासराव. |
| १० बाळाजी आवजी चिटनीवीस. | ३२ विसाजी पंत मथुरे. |
| | ३३ कृष्णाजी जोशी. |
| ११ चिमणाजी आवजी दप्तरदार. | ३४ नरहर आनंदराव |
| | ३५ बाळंभट गोसावी उपाध्ये. |
| १२ तिमाजी केशव सबनीस | |
| १३ भास्करभट उपाध्ये. | ३६ कृष्णाजी सरवाजी. |
| १४ शामजी नाईक पुंडे पोतदार | ३७ शामजी आवजी कारखानीस. |
| १५ शंकाजी निळकंठ | |
| १६ रघुनाथ बल्लाळ कोरडे. | ३८ एसाजी गोविंद. |
| १७ बाळाजी रघुनाथ. | ३९ शामराव पद्मनाथ. |
| १८ नरहर बल्लाळ सबनीस | ४० गोविंद भटजी उपाध्ये. |
| १९ रावजी सोमनाथ रूमे. | |
| २० व्यंकाजी दत्ताजी. | |
| २१ त्रिंबक भास्कर. | |

## सरदारलोक.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | हसाजी हंबिरराव मोहिते सरनोबत. | ३ | बहिरजी नाईक इंगळे. |
| | | ४ | खंडोजी जगताप. |
| २ | गोमाजी नाईक पानसबळ | ५ | गोंदजी जगताप. |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | सताजी राजे भोसले शा | २१ | संताजी जगताप |
| | हाजीराजे महाराज यांचे | २२ | बाजी जळगे. |
| | नाटक शाळेचे पुत्र. | २३ | मालोजी नलगडे. |
| ७ | साबाजी भोसले शिंगणा | २४ | हिरोजी शेळके. |
| | पूरकर. | २५ | मालोजी निंबाळकर. |
| ८ | रुपाजी भोसले सरदार. | २६ | जेशिंग पालकर |
| ९ | मानशिंग मोरे. | २७ | आनंदराव निंबाळकर. |
| १० | माहादजी नाईक पानस- | २८ | बाजी मोहिते. |
| | बळ. | २९ | पदाजी काठकर. |
| ११ | मकाजी अनंदराव. | ३० | नेटाजी काठकर. |
| १२ | सुधोजी खाजणकर. | ३१ | पिलाजी शिर्के. |
| १३ | गणोजी दरेकर. | ३२ | तानाजी शिर्के. |
| १४ | कान्होजी आगरे. | ३३ | गणोजी शिर्के (पिलोजीचे |
| १५ | संताजी घोरपडे | ३४ | पुत्र) |
| १६ | धनाजी जाधवराव. | ३५ | संभाजी शिर्के. |
| १७ | तैलगराव पागे सरदार. | ३६ | जेशिंग पालकर. |
| १८ | एकोजी खाडेकर जुमले | ३७ | परसोजी भोसले. |
| | दार. | ३८ | मुजवलराव. |
| १९ | सोमवंशी. | ३९ | अरेराव. |
| २० | कान्होजी भाडवळकर | ४० | बहिरजी घोरपडे. |

४० संभाजी काटकर.
४१ सूर्याजी काटकर.
४२ रायाजी गडधे.
४३ देवजी उघडे.
४४ केरोजी पवार.
४५ परसोजी शिंतोळे.
४६ रामाजी जळगे
४७ एसाजी खांडेकर.
४८ बुबाजी पवार.
४९ कृष्णाजी घाटगे.
५० कृष्णाजी पवार.
५१ संभाजी कावजी.
५२ आपणे.
५३ रामोजी शिर्के.
५४ वाघोजी शिर्के.
५५ हरजी राजे महाडीक.
५६ अनंदरावटफहजारी.
५७ तुकोजी पालकर.
५८ उचले.
५९ आनलोजीराजेमहाडीक.
६० महादजीनाईक निंबाळकर
६१ एसाजी मोरात.
६२ खंडेराव दाभाडे.
६३ नेमाजी शिंदे.
६४ खंडोजी आटोळे.
६५ बहिरजी बडगर.
६६ बळवंतराव देवकाते.
६७ भवानराव देवकाते.
६८ माहूणवर.
६९ काकडे.
७० कडु.
७१ कोकाटे.
७२ आमरोजी पांढरे.
७३ अमृतराव निंबाळकर.
७४ बाळोजी नाईक निंबाळकर
रे
७५ ढमढेरे
७६ हांडे.
७७ मालोजी निंबाळकर

| | पायदळाचेसरदार<br>मावळेलोक | | |
|---|---|---|---|
| १ | एसाजी कंक सरनोबत | १८ | हिरोजी राळे. |
| २ | तानाजीराव मालुसरे. | १९ | रामोजी मोरे. |
| ३ | जिव माहाला | २० | डोळे. |
| ४ | सोनमाहाला. | २१ | नानाजी दुदुसकर. |
| ५ | शनपाटील एशवंतराव | २२ | पिलाजी सणस. |
| ६ | रामाजी विश्वासराव. | २३ | जावजी पारठे. |
| ७ | कृष्णाजी नाईक. | २४ | सुधोजी हुणकणे. |
| ८ | सभानजी नाईक. | २५ | विठुजी कडु. |
| ९ | नाना सावंत | २६ | इदाजी गोरड. |
| १० | कोंडजी वळखळे. | २७ | महादजी फर्जंद. |
| ११ | बाजीराव पासलकर | २८ | हिरोजी फर्जंद. |
| १२ | बावाजी प्रभुदेशपांडे. | २९ | नागोजी फर्जंद नाईक. |
| १३ | हिरडस मावळकर. | ३० | बरवाजी फर्जंद. |
| १४ | बाजीमुरारदेशपांडेमहाडकर. | ३१ | पारठे. |
| | | ३२ | ठाकुर |
| १५ | ढवळे. | ३३ | ढमाले. |
| १६ | कुडाळकर. | ३४ | दादाजी बापुजी देशपांडे |
| १७ | मळघटे. | ३५ | चिमणाजी बापुजी देशपांडे |

णीं दक्षता ठेविली होती. सर्व काळ धर्मवासना असू न त्यांचे हातून दक्षिणदेशांत व हिंदुस्थानांत मो ठमोठे अधिकार व संस्थानें अधिकार देऊन कैला सवासी झाले. त्याजकडे कोट्यावधीरुपयांचींसंस्था नें अद्यापि चालत आहेत. व ब्राह्मणास वगैरे लक्षा वधीरुपयांचीं इनामें वंशपरंपरा चालण्या सारखीं करून दिलीं; तीं त्याजकडे चालत असून ते लोक फार खुशाल आहेत. असा धार्मिक राजा पुनःहो णारनाहीं. यांची कारकीर्द बेचाळीस वर्षे चालली.

# भागसातवा.

## कारकीर्द रामराजे महाराज यांची.

शके १६७१ सन १७४९ या वर्षी बाळाजि विश्वनाथ पेशवे यांणीं शाहूमहाराज यांचे आज्ञे प्रमाणें धाकटे शिवाजी करवीरचे यांचा पुत्र बारशी एथें होता, त्यांचा शोध करून आणून सातारचे गादी वर बसवून त्याचे नांव रामराजेमहाराज ठेऊन- त्यांस इतमामी माणसांचे खर्चास नेमणूक करून राज्यकारभार स्वतंत्रपणें पेशवे करूंलागले.

या महाराजास स्त्रिया तीन होत्या. त्यांत वडील स्त्री तुकाबाई नेवासकर मोहिते यांची कन्या. दुसरी जानकीबाई मोहिते विंगकर यांची कन्या. तिसरी, सगुणाबाई. बराणजी मोहिते यांची कन्या.

यांस औरस पुत्र नव्हता; म्हणून त्यांणीं आपला वृध्दापकाळ जाणून आपले पूर्वज मालोजी भोसले यांचे बंधू विठोजी भोसले यांचे वंशांतील भिंबकजी भोसले वावीकर यांस दत्तक घेऊन त्याचें नांव शाहूमहाराज आबासाहेब ठेविलें.

नंतर रामराजे महाराज शाके १६९९ सन १७७७ या वर्षी कैलासवासी झाले.

यांची कारकीर्द अठ्ठावीस वर्षे चालली.

---

## भाग आठवा.

## कारकीर्द शाहु महाराज आबासाहेब यांची.

रामराजे कैलासवासी झाल्या वर शाहु महाराज आबासाहेब यांस शाके १७०१ सन १७७९ या वर्षी सातारचे गादीवर बसवून पेशवे राज्यकारभार चालवित होते.

या महाराजांस स्त्रिया होत्या. पहिली, लक्ष्मबाई, नारायणजी मोहिते माजगांवकर यांची कन्या. दुसरी कमळजाबाई, नरसिंगराव गुजर यांची बहीण. तिसरी, गुणवंताबाई, आबाजीराजे महाडीक यांची बहीण. चौथी, आनंदीबाई, भवानजीराजे शिर्के यांची कन्या.

या चौघी स्त्रियांतून आनंदीबाई यांस पुत्र जाह्ले ते-

१ वडील पुत्र प्रतापसिंह्महाराज यांचा जन्म शके १७१४ माघ शुध्द सप्तमी सन १७९२ इसवीं या वर्षी झाला.

२ दुसरे पुत्र रामचंद्रराजे महाराज भाऊसाहेब यांचा जन्म शके १७१७ सन १७९५ या वर्षी झाला; ते भाऊसाहेब प्रतापसिंह्महाराजांचे कारकीर्दीत शके १७४१ सन १८१९ इसवी या वर्षी कैलासवासी झाले; त्यांस दोन स्त्रिया होत्या पहिली, डेरवणकर शिर्के यांची कन्या; ती भ्रतार असतांच कैलासवासी झाली. दुसरी कुसाजी राजे महाडिक यांची कन्या; ती शके १७४५ सन १८३३ इसवी सालीं भ्रतार वारल्या वर मरण पावली.

३ तिसरे पुत्राचें नांव शाहाजीमहाराज आपासाहेब यांचा जन्म शके १७२४ सन १८०२ इसवी या वर्षी झाला.

---

या प्रमाणें तीन पुत्र होते.

शाहूमहाराज आबासाहेब शाके १७३० सन १८०८ इसवी या वर्षी कैलासवासी झाले. त्यांचे नावाची कारकीर्द अकरावर्षे चालली.

नंतर त्यांचे वडील पुत्र प्रतापसिंह महाराज यांस त्याच वेळेस बाजीराव रघुनाथ पेशवे यांणी गादीवर बसवून त्याचे नावें आपण राज्य चालवित होते

---



# भागनववा.

## कारकीर्दप्रतापसिद्धमहाराज यांची.

हे महाराज व बंधु उभयतां आणि मातोश्री असे बाजिराव रघुनाथ पेशवे यांची व इंग्लिशाचील दायी होऊन पेशवे पळनअसतां त्याचे लश्करांतहोते तेथून त्यांणीं इंग्लिशाशीं धोरण केले.

मग आष्टे मुकाम चे लढायींत महाराज इंग्लिशांस मिळाले. पुढें पेशवे यांज कडे महाराजाचेंराज्य वहिवाटीस होते, ते इंग्लिशानी घेऊन तें सर्व राज्य महाराजाचें असें जाणून त्याचे शौकती करतां वसूली बारालक्ष रुपयांचा मुलुख नेमून देऊन सातारा संस्थानचे गादी वर शके १७४० सन १८१८ इसवी या वर्षी कायम केले.

या खेरीज त्यांचे ताब्यांत लहान मोठे सरंजामी नेमून दिले, त्यांतील मुख्यत्वें करून, खालीं दर्शविले आहेत.

१ पंतप्रतिनिधी यांजकडे कमाल दोन लक्ष आकाराचा मुलुख.

२ अक्कलकोटकर भोसले यांजकडे कमाल तीनल क्ष आकाराचा मुलुख.

३ पंतसचीव यांजकडे कमाल तीनलक्ष आकारा चा मुलुख.

४ निंबाळकर परगणें फलटण यांज कडे कदीम लाखरुपयांचा मुलुख.

५ डफळे परगणें जत व करजगी यांजकडे क डे कदीम पाऊणलक्षाचा मुलुख.

६ शेखमिरावाईकर यांज कडे कदीम वीसहजारा चा मुलुख.

---

या खेरिज मंत्री, थोरात, घारगे वगैरे लहा न सरंजामी नेमून दिले होते.

या महाराजांनीं आपले कारकीर्दीत प्रतिनि-धी व अष्टप्रधान व दरकदार केले. ते,—

## पंतप्रतिनिधी.

१ परशुराम त्रिंबक पहिलेच होते.

---

## अष्टप्रधान.

१ पंतप्रधान बाजीरावरघुनाथ बल्लवर्तास-

होते; ह्मणून तें पद कोणास नदेतां त्याचे ऐवजीं दिवाण असें पद योजून विठ्ठलबल्लाळ महाजनी पुरातन परंपराचे नोकर, आणि जातीनें फारउप योगाचीं कामें केलेले भरवशाचे ह्मणून त्याजला- दिले. ते मरण पावल्या वर ते सर्व काम त्यांचे वडील चिरंजीव गोविंदराव विठ्ठल यांज कडे सांगितलें त्याजवर सरकारची पूर्ण मेहरबानी होती.

२ पंतअमात्य सर्वोत्तम बाबुराव पहिलेच होते; ते मरण पावल्या वर ती पदवी बापुकान्हो फडणीस पुरातन परंपराचे नोकर असून चतुरशिंग राजा बरोबर खस्त खालेले भरवशाचे होते; त्यास शके- १७६७ सन १८४५ इसवी या वर्षीं देवाज्ञा झाली तों पर्यंत त्यांज कडे ती पदवी होती.

३ पंतसचीव चिमणाजी पंडित होते; ते मरण पावल्या वर त्यांचे दत्तपुत्र रघुनाथराव चिमणाजी होते

४ सेनापति हें पद प्रथम थोडेच दिवस कोणास- दिलें नव्हतें; मग बळवंतराव राजे भोसले सरलष्कर यांस देऊन संपूर्ण फौजचें काम कुल अकत्यारीनें दिले. त्याज कडील खर्चाचे वगैरे कोणते ही कामांत दुसरी दखलगिरी कोणाची नव्हती. ते काम त्याजक

डे महाराज काशीस जाई तोंपर्यंत होते, पुढें सेना पति धारल्यावर त्यांस दत्तपुत्र दिलेले हल्लीं म हाराजांचे चिरंजिवा पाशीं सातार मुकामीं आहेत.

५ पंतमंत्री जयवंतराव पहिलेच होते; ते मृत्यु पावल्या वर त्यांणीं आपले बंधूचे पुत्र दत्तक घेत लेले रघुनाथराव जयवंत यांस त्या अधिकारावर कायम केलें.

६ पंतसुमंत ही पदवी काहीं दिवस कोणास दि ली नव्हती, नंतर बळवंतराव मल्हार चिटणीस पुरातन नोकर आणि त्यांचे वाडवडिली सरका रचीं मोठ मोठीं कामें करून उपयोगी पडले होते म्हणून त्यास तें पद देऊन महाराज काशीस जाई तों पर्यंत कायम ठेविलें. व त्याज वर महाराजांची- दया फार होती.

७ न्यायाधिश ही पदवी चिंतामण चिटको मा- टे मुनीम अदालत यांस शके १७५८ सन १८३६ या वर्षी दसन्यास दिली. ती त्याज कडे तीन वर्षे होती.

८ पंडितराव रघुनाथराव होते; ते मरण पाव- ल्यानंतर त्यांचे दत्तपुत्र रामचंद्रराव रघुनाथ या-

स तो अधिकार दिला.

---

## दरकदार.

१ सरलष्करची पदवी प्रथम बळवंतराव भोसले यांस दिली. नंतर त्यास सेनापति पद दिल्यावर स रलष्करी खंडेरावराजे शिर्के यांस दिली. त्याज व र सरकारची पूर्ण कृपा होती.

२ फडणीशिचा दरक प्रथम कृष्णराव कानडे यां जकडे होता; ते मरण पावल्या वर बापूकान्हो खासगी फडणीस पुरातन नौकर भरंवशाचे आणि सरकारचे उपयोगी पडलेले, असें जाणून त्यांस देऊन खासगी फडणीशी त्यांचे दत्तपुत्र सखारा म बापूजी हे लहानपणापासून हुशारीनें सरकार जवळ वागत होते त्यास दिल्या नंतर बापु कान्हो म रण पावल्या वर दौलती कडील फडणीशीही स खाराम बापूजी यांस दिली. त्याजवर महाराजांची पूर्ण कृपा होती. कारण ते काम करण्यास लायक विश्वासू, अशी महाराजांची खात्री होती.

चिटणीशी बळवंतराव मल्हार यांजकडे, कार णत्याचें पुरातन वतनी. आणि त्याचे वाडवडिली

मोठीं कामें करून सरकारचे उपयोगी पडलेले असें समजून त्याज कडे चालविली; त्यांज वर महाराज यांची पूर्ण मेहरबानी होती.

४ सेनाकर्ते ही पदवी कांहीं दिवस नव्हती; नंतर दिनकरराव हंबिरराव मोहिते यांस दिली; तीत्यांज कडे महाराज काशीस जाई तों होती.

५ बक्षिगिरीचा दरक बळवंतराव रामचंद्र हे पुरातन पदरचे व तें काम त्याचे वाडवडिली करीत आलेले ह्मणून त्यास दिला; त्यांचे पश्चात् त्यांचे चिरंजीव सखाराम बळवंत यांस दिला. त्या उभयतांवर सरकारची पूर्ण कृपा होती.

६ राजाज्ञा हें पद कांहीं दिवस कोणास दिलें नवतें; मग केसो एशवंत आकरे यांज वर फार लोभ असून खासगी कारभारी होते, त्यांस दिलें. तें त्याजकडे खासगी काम मुकत्यारीनें असून फार भरंवशानें वागत होते; ती पदवी त्यांज कडे महाराज काशीस जाई तों पर्यंत होती.

७ दमरदारीचा दरक पहिल्यानें वासुदेवपंत अभ्यंकर यांस दिला. मग त्यांजवर कांहीं आरोप आल्या वर एशवंतराव गडबोले सरसुभेदार यांस दिला. ते

काशीस गेल्या वर रामचंद्रगंगाधर जोशी सरस्भे दार यांस दिला

८ पोतनिशीचा दरक. शिवराव पोतनीस पुरातन वडिलोपार्जित भरवशाचे नोकर याज कडे होता.

९ शिकनिशीचा दरक प्रथमतः अमृतराव उपाध्ये यांस दिला; ते वारल्या वर सखाराम बल्लाळ कान्हेरे पुरातन नोकर यांस दिला.

१० खेरिज अदालत व दप्तर व फौज खात्यांत मोठ्या योग्यतेचे कामगार लोक पुष्कळ होते.

या महाराजांस स्त्रिया किती होत्या; त्यांची व्यवस्था काय झाली त्या विषयीं;

२ रामराव मोहिते अकलुजकर यांच्या बहिणी.

१ वडील स्त्री लक्ष्मीबाई महाराज ही महाराज असतांच सातार मुकामी कैलासवासी झाली त्याज वर फार प्रीति होती; त्यांणी अंतकाळीं आपली बहिण करावी, असें मागून घेतलें.

२ दुसरी स्त्री त्यांची बहिण करून त्यांचे ही नांव लक्ष्मीबाई महाराज ठेविलें; त्यांस दोन कन्या झाल्या.

१ एक कमासाहेब लहानपणी मृत्यु पावली

२ दुसरी गोजरासाहेब यांचें लग्न शके १७५६ सन १८३४ इसवी या वर्षी मोठ्या समारंभानें झालें त्यास पंचवीस हजार रुपये खर्च केले त्यास एक पुत्र झाला त्याचें नांव मनापराव गुजर यांस दरमहा पेनशन एक हजार रुपये—व दुसरें सालिना एक हजार रुपयांचें उत्पन्न आहे, ते हल्लीं सातान्यांत आहेत या शिवाय एक कन्या होती ती फलटणकर निंबाळकर यांस दिली होती ती गोजरासाहेब काशीहून येऊन शके १७७५ सन १८५३ इसवी साली कैलासवासी झाली.

---

ही राणीसाहेब काशी मुकामीं महाराज असतां कैलासवासी झाली.

३ तिसरी स्त्री राजसबाई साहेब महाराज त्यांसच माईसाहेब ह्मणतात.

---

या महाराजाची बुध्दि फार विशाळ असून बोलकेपणा उत्तमप्रकारचा होता आणि धूर्तता

चांगली असून घोडया वर बसणें व लोथाटी वगैरे करण्यांत प्रवीणता होती; अंतःकरण सदय असून परचे लोकांचा अभिमान फार होता; सर्व लोक हुशार होते; या मुळें राज्याची सुधारणूक थोडेचदिवसांत झाली.

या पुढें प्रतापसिव्ह महाराज यांचे मनांत कांही राज्य कारण करावें असें येऊन त्यांणीं इंग्रजसरकारचे विरुध्द फितूर व दंगा करण्या विषयीं पुष्कळ दिवस गुप्त रीतीनें मसलत चालविली होती.

शके १७६० सन १८३८ इसवीचे सुमारासप्रतापसिव्हराजे आणि त्यांचे कनिष्ट बंधू शाहाजी उर्फ आपासाहेब महाराज यांचे वैमनस्य पडलें; तें शेवटीं इतकें वाढलें कीं, आपासाहेब महाराज सातारा सोडून माळावर तंबू देऊन राहिले. त्यांचेमसलतींत बाळाजी नारायण नातू वगैरे मंडळी होती.

पुढें प्रतापसिव्हराजे यांचे फितुराचे मसलती विषयीं ही इंग्रज लोकांची खात्री होऊन शेवटीं मुंबईहून रिविटकरनेक साहेब मुंबईचे गवरनर हे कलकत्याचे गवरनरजनरल यांचे हुकुमानेस

र्व मुकत्यारी घेऊन साताऱ्यास आले; त्यांणीं किती एक प्रकारें उपदेशाचा सल्ला महाराजांस देऊन खरे प्रकारें मजकूर सांगितल्यास इंग्रजसरकार माफी करतील असे भावानें महाराज यांज पाशीं दोन तीन वेळां बोलले. तथापि महाराजानीं आग्रहानें आपल्यास कांहीं एक माहित नाहीं; असें साफ सांगितलें; या प्रमाणें साहेबाचे बंगल्यांत साताऱ्यासशेवटीं बोलणें होऊन महाराज परत आले. पुढें थोडेच वेळांत महाराज यांस पश्चाताप होऊन आणखी कांहीं बोलणें आहे; असा साहेबांस निरोप पाठविला. परंतु पुढें साहेबांची भेट न्हहोतां साहेब-महाबळेश्वरास निघून गेले.

महाराजानी कबूल केलें नाहीं तरी इंग्रजसरकारची फितुराविषयीं खात्री झाली होती म्हणून प्रतापसिंहराजे यांस मेहरबान करनेल ओविसनसाहेब रसिदंट सातारा यांणीं शके १७६१ श्रावण वद्य त्रयोदशी गुरुवार सन १८३९ इसवी रोजीं प्रातः-काळीं सहावाजतां सातार मुकामीं धरून कैद केलें आणि लिंबावर साताऱ्या नजीक ठेविलें.

पुढें तेथून तीन महिन्याचे सुमारें निघून प्रता

पसिद्ध राजे हिंदुस्थानांत जाऊन श्रीकाशी क्षेत्री रा हण्याचें कबूल केलें, त्या वरून त्याला इंग्लिश सरका रानीं नेऊन काशी क्षेत्रांत ठेविलें.

काशी मुकामीं प्रतापसिद्धराजे यांणीं बळवंतरा व भोसले सेनापति यांचे चिरंजीव दत्तक घेऊन त्या चें नाव शाहूमहाराज ठेविलें.

हे शाहूमहाराज पुढें प्रतापसिद्ध राजे मेल्या व र काशीहून येऊन साताऱ्यास राहिले होते, त्यांज व र सन १८५७ इसवी शके १७७९ चे सुमारास हिं दुस्थानांत दंगा झाला, त्या वेळेस राजेसाहेब यांज ला, साताऱ्चे कलेक्टर यांणीं संशया वरून साता ऱ्यातून काढून कराची एथें नेऊन ठेविले

हल्लीं तेथें ते आहेत.

प्रतापसिद्धराजे काशीस शके १७६९ आश्वि न शुध्द पंचमी सन १८४७ इसवी या वर्षी कैला सवासी झाले.

# भाग दहावा.

---

## कारकीर्द शाहाजीमहाराज आपा साहेब यांची.

या महाराजास शके १७६१ श्रावण वद्य ६ गुरुवार सन १८३९ इसवी तारीख ४ माहे सपटंबर-रोजीं सातारचे राज्याधिकारावर इंग्लिश सरकारानीं काईम केलें. आणि सर्व लोकांस जाहिरनामा-प्रसिध्द केला. ( तो असा )

जाहिरनामा — सरकारदौलत मदार कंपिनी इंग्रजबहादुर विद्यमान लफ्टनेंट करनल ओविन साहेब बहादुर रसिडंट सातारा यांस — बंदिगान-अलिनबाब मुस्तताब आनराबल सरजेम्स रिविट करनेक बारोनेट गवरनर साहेब जंजिरे मुंबई यांणीं अकत्यार दिल्यावरून तमामलोकांस महशूर होण्याकरतां हा जाहिरनामा प्रगट केला जातो; सरसन आर्बैनमयातेन व अल्लफ

१. बाजीरावसाहेब यांणीं कारण नसतां दुस्मानी केली; त्याजवरून इंग्लिशसरकारांस जरूर

पडून त्याशीं लढायी केली; तेव्हां आनराबल मि स्तर एल्फिन्स्तन्साहेब बहादुर पेशव्या कडील- सर केलेले मुलखाचें बंदोबस्ता करण्या करतां क मिशनर होते; यांणीं तारीख ११ माहे फेब्रुवारी स न १८१८ इसवीचा जाहिरनामा केला. त्यांत बाजी राव साहेब याशीं कोणते कारणा वरून लढायी क रणें ज़रूर जाहलें; तीं कारणें लिहिलीं आहेत;व त्यांत खालीं लिहिलें आहे जे;-

महाराज छत्रपति सातारकर हल्लीं बाजिराव साहेब यांचे कैदेंत आहेत; त्यास सोडवून घेऊन- मोकळें करून त्यांचे व त्यांचे मडळीचे शानशोक ती करतां कांहीं राज्य त्याजकडे चालेल; अशी त जवीज होऊन सातारा किल्ला घेऊन त्या वर महा राज यांचा झेंडा कायम करून त्याचे तर्फेचे पहि ले कारभारी यांस आपले कामा वर कायम केले आहेत. त्यास जो मुलुख महाराज यांज कडे हो ईल; त्यांत न्याय इनसाफ व हुकुमत व अमल त करतील; कंपनी सरकारांत मुलुख राहिल; ते थें कंपनी सरकारचा अम्मल होईल; ववसूल स रकारांत घेतलाजाईल; परंतु मालमत्ता स र्व

ज्याची त्याज कडे राहिल; कोणाचे वतनास वइ नामास व वर्षासनास व देवस्थानचे खर्चास व- खैरातीस व कोणाचे ज्ञातीचे धर्मास खलेल न होतां, वाजवी असेल; तसें सुरळित चालेल असें लिहिलें आहे.

२. आष्टे एथें पेशव्यांचा मोड होऊन सातारकर महाराज यांस प्रतिबंधातून मुक्त करून सदर्हू जाहिरनाम्यांत लिहिल्या प्रमाणें सिंव्हासनारूढ केलें. व दोस्तीचा तहनामा जाबिता राबिता चालविण्या करतां महाराज व इंग्रज बहादुर यांचा तारीख २५ माहे सपटंबर सन १८१९ इसवीचा झाला. त्या तहनाम्याचे दुसरे कलमांत महाराज आपण व आपले फर्जंद व वारिस वकायममुकाम यांचे तर्फेनें करार केला आहे कीं सरकार इंग्रज बहादुर यांचे सरकारातून राज्य देत आहेत तें घेऊन सरकार इंग्रज बहादुर यांचे कह्यांत व मदतींत निरंतर संतोषानें राहून इंग्रजसरकार बहादुर यांचे सल्लामसलतीनें हरएक काम करीत जाऊं; असा करार आहे; आणि पांचवे कलमांत महाराज यांणीं आपण व आपले फर्जंद व वारिस वकायम

यांचे तर्फेनें करार केला आहे की याकराराप्रमाणें आ पले कडील राज्याशिवाय दुसरे कोणी सरदार किं वा जाहगिरदार किंवा वकील वगैरे हरकोणास प त्र पाठविणार नाहीं व त्याशीं जाबसाल ठेवणार नाही असें आहे; व आणखी त्याच कलमांत लिहिलें आ हें कीं सदरीं लिहिलेले सरदार वगैरे लोक याशीं म हाराजाचें कामकाज प्रकरणीं तकरार पडल्यास त्यां चा बंदोबस्त इंग्रज बहादुर सरकार करतील; —वर करार झाला आहे, त्या मुलकातील लोकांशिवाय बा हेरचे लोकांशीं लग्नाचें अगर घरगुती काहीं कारण पडल्यास इंग्रजबहादुर यांचे सरदाराचे मार्फतीनें करीतजातील. व त्याच कलमांत शेवटीं असें लि- हिलें आहे कीं, हेंच कलम यां तहनाम्याची शर्त- आहे यांत महाराजांचे इंग्रज सरकारातून का हीं तफावत पडल्यास या तहनाम्याने महाराज सर कारास जो फायदा आहे तो बरबाद होईल; असें- त्यांत लिहिलें आहे.

३ सदरहू प्रमाणें करारनामा कायम झाला अ सतां महाराज यांणीं आपले करारा वर लक्ष्य न ठेवितां व इंग्रजीसरकारांतून आपणा वर उदार

पणें मेहरबानी करून कैदेंतून सोडवून सिंव्हासना रूढ केलें, तें मनांत नआणतां कितीएक वर्षांपासून तहनाम्याचे पांचवे कलमांतील करार मोडून गुप्त बोलणी चालू ठेविलीं; आणि त्यांणीं मोठमोठे इरादे मनांत आणिले; ते असे कीं, त्यांत इंग्लिश सरकारचा नाश व्हावा; आणि तहनाम्यास विरुद्ध असे दावे व बोलणीं चालविली. आणि उभय सरकार यांचे दर्म्यान दोस्ती झाली, त्याची नसनस व्हावी, अशी त्यांजकडून वागणूक झाली; असें साफ शाबूद होउन इंग्लिश सरकाराची खातर जमा झाली.

४ असें असतां महाराज याणीं खराब मसलती लोकांचा सल्ला ऐकून अशीं कृत्यें केलीं असतील असें इंग्लिश सरकार यांणीं मानून आपण जी दया करूं ती महाराज आपले दिलांत वागवून तेंनुकसान होण्याचे मार्गांत शिरले. तो मार्ग सोडतील अशी उमेद व इतिजारी येउन इंग्लिश सरकारांतून असें ठरविलें होतें कीं, महाराज यांणीं कबूल व्हावें कीं, आह्मी पुढें तहनाम्यांत जसजसें लिहिलें आहे, त्या बरहुकूम अंतःकरणापासून

स्वच्छतेनें चालू. आणि उभय सरकारचे वांकडे पणास जें मुख्य कारण जो कारभारी त्याजला म सलतीतून काढून टाकू. आणि तहनाम्यास विरू ध्द जीं कामें त्यांजकडून झाली, तीं ज्या लोकांचे जाहिर करण्यावरून शाबिद झाले त्या लोकांचा नाश करणार नाहीं; असें त्यांणी कबूल केलें असतां जें झालें, तें मनात नठेवितां माफ करावें; असें-ठरविलें होतें.

५ सदरी लिहिल्याप्रमाणें करावें; या हेतूनें हनराबल सरजेम्स रिविटेकर नेक बारोनेट साहेब बहादुर गव्हरनर जजिरे मुंबई हे त्यास नबाब मुस्तताब मे अलाअलकाब अशारुल अशराफ रेट अनराबल लार्ड अकलंड साहेब बहादुर इंडियाचे गव्हरनर जनरल यांणीं मुकत्यारी दिल्यावरून खुद्द जातिनिशी साताऱ्यास येउन महाराज यांस सांगितलें कीं, आपण आपल्यास अपाय होण्याचे रीतीनें वागतां; असें त्यांस समजाविलें; आणि जे करार कबूल करून घेऊन जें झालें तें माफ करण्याची इंग्लिश सरकाराची खुषी होती, ते करार महाराज यांस मुखजबानी व लि

हून कळविलें; व हे करार कबूल करणें, इतकी-
चें तोंडदोस्तीवएकपणा जारी होण्याची; यास्तव ते
करार महाराज यांणीं कबूल केले पाहिजेत; अ
सें त्यांस बहुत तऱ्हेनें समजाविलें.

६ महाराज यांची अनेक वेळ बोलणी झाली; व त्यांस मनन करण्यास पुष्कळ फुरसद होती; व कबूल न केलें असतां परिणाम काय, हें त्यांस स्पष्ट सांगितलें असतां ही त्यांणीं ते करार कबूल केले नाहींत; या करतां सदरीं तपशील लिहिलाप्रमाणें रीतीनें जो तहनामा झाला, त्या तहनाम्यावर महाराजांनीं इतकी कमनजर ठेविली त्या महाराजाशीं पुढें दोस्तीचाशिलशिला चालविणें अशक्य, अशी इंग्लिश सरकाराची खातरजमा झाली; त्यावरून हा जाहिरनामा करून उभय सरकारांची दोस्ती होती ती बरबाद केली, असें तारीख २५ माहे सपटंबर सन १८१९ इसवीचा तहनामा महाराजाशीं झाला; त्यांतील पांचवे कलमांत शर्त ठरल्याप्रमाणें अमलांत आणण्याचा इंग्लिश सरकाराचा इरादा आहे.

७ परंतु आपला फायदा व्हावा, अथवा आ

पला मुलुख मोठा व्हावा, ही इच्छा इंग्लिशसर कारची नाहीं, सबब असें ठरविलें आहे की प्रताप सिंह महाराज यांचे बंधू शाहाजीराजे महाराज हे वारस यास सातान्याचे मुलुखाची सरहद्द तारीख पंचवीस माहे सपटूंबर सन १८१९ इसवीचे तहना म्यांत ठरले आहे, त्या प्रमाणे त्या मुलखाचें राज्य त्यास देऊन शाहाजी राजे हे सातान्याचे श्रीमन्म हाराज छत्रपति असें जाहिर होण्या करतां हाजा हिरनामा करून सर्वास प्रसिध्द केलें असें. तरी जे लोक त्याचे मुलखांत राहात आहेत, त्यांणीं त्याशीं रुजू राहावें. अशी ताकीद या जाहिरनाम्या वरून असे.

हा जाहिरनामा सात कलमाचा तमामलोकां स महशूर होण्या करतां प्रगट केला असे.

तारीख ४ माहे सपटूंबर सन १८३९ ईसवी मुताबिला छं० २५ माहे मजकूर सुरसन आर्बे न मयातैनव अल्लफ मुकाम सातारा.

---

या महाराजांचे ताब्यांत पूर्वी प्रतापसिंह महाराजांचे कारकीर्दीत दुसरे कलमांत लिहिलेले सर्व जाहगिरदार व सरंजामीलोक दिले.

या महाराजांनीं आपले कारकीर्दीत अष्टप्रधान, प्रतिनिधी व दरकदार वगैरे केले ते :—

---

प्रतिनिधी.

१ परशुराम श्रीनिवास पहिलेच होते, त्यांस महाराजानीं आपण असतां हिवरेकर यांजपैकीं दत्तपुत्र देऊन त्याचें नांव श्रीनिवासराव ठेवून त्याचें लग्न मोठ्या समारंभानें आपले वाड्यांत करून दौलतीस मालक करून ठेविलें, त्यांचे तीर्थरूप कैलासवासी झाल्या वर सरकार कंपनी याणीं महाराजांचे ठरावा प्रमाणें कायम करून ते आपले दौलतीचा उपभोग करीत आहेत.

---

अष्टप्रधान.

१ पेशवे प्रधान बाजीराव रघुनाथ ब्रह्मवर्तास कायम होते ह्मणून तें पद कोणास नदेतां

त्या ऐवजीं कारभारी अशी पदवी योजून आपण गादीवर बसतांच नरहर रघुनाथ पराडकर यांस दिली. ती त्यांज कडे सातम हिने होती, मग त्यांजवर अलोभ होऊन-कांहीं दिवस कोणास दिलीनाहीं पुढें सन १८४३इसवी या वर्षी यशवंतराव त्रिंबक फौजदार यांस दिवाणगिरी दिली, ती त्या जकडे सन १८४५ शाके १७६७ श्रावणमा सपर्यंत होती.

२ सेनापति ही पदवी खंडेराव राजे शिर्के सर लश्कर यांस शाके १७६५ सन १८४३ याव र्षी दिली.

३ पंतसचीव ही पदवी महाराज गादी वरबस तांच त्या संस्थानचे रघुनाथराव यांचे दत्तपु त्र चिमणाजीरघुनाथ यांस दिली; ते हल्लीं कायम असून आपले दौलतीचा उपभोग क रीत आहेत. त्यांस एक औरस पुत्र झाला-आहे; त्यांचे नाव शंकरराव आहे.

४ पंत अमात्य ही पदवी सखाराम बापुजी फ डणीस यांस शाके १७६१ सन १८३९ इसवी

या साली दिली, ती त्यांज कडे चालत आ
हे.

५ पंतमंत्री रघुनाथराव जयवंत पहिलेचहो
ते, ते हल्लीं कायम आहेत; त्यांस दोन और
स पुत्र आहेत.

६ पंतसुमंत ही पदवी वेणूबाई सुमंत यांचेद
त्तक पुत्र रामचंद्र गोपाळ यांस शके १७६१
सन १८३९ इसवी सालीं दिली; त्यांस एक
औरस पुत्र आहे.

७ न्यायाधिश ही पदवी कांहीं दिवस जोतिंभि
बक फौजदार यांज कडे होती; मग ते मृत्यु
पावले.

८ पंडितराव रामचंद्रराव रघुनाथराव पहिले
च होते; ते हल्लीं कायम आहेत.

---

## दरकदार.

१ सरलश्कर ही पदवी खंडेरावराजे शिर्के यां
स पहिलीच होती, त्यांस सेनापति पद दि-
ल्या वर त्यांचे वडील चिरंजीव आबाजी
राजे यांस सरलश्करी दिली; त्यांचे तीर्थरू

प पश्चात सेनापति वारल्या वर त्याचा अधि कार आबाजीराजे यांज कडे इंग्रजानीं काय म केला. ते हल्लीं कायम आहेत.

२ फडणीशीचा दरक सखाराम बापूजी यांज-कडे पहिलाच होता, ते हल्लीं कायम असून त्यांज कडे खासगी सुध्दां दोनी दरक चालतात व त्यांज वर महाराजाचा फार भरंवसा होता.

३ चिटणीशीचा दरक केसो एशवंत फौजदार यांस शाके १७६५ सन् १८४३ इसवीसालीं दिला तो त्या कडे शाके १७६९ सन १८४७ इ सवी अखेर होता, पुढें वासुदेवकृष्ण महा-जनी यांज कडे दिला, तो महाराजांचे पश्चा-त थोडकेच दिवस चालला.

४ सेनाकर्ते ही सरदारी जानराव भोईटे यांसश के १७६५ सन १८४३ इसवी सालीं दिली ती त्यांज कडे यावत जीव चालली.

५ बक्षगिरीचा दरक मुधोजी राजे महाडिक या स शाके १७६५ सन १८४३ इसवी सालींदि ला, तो त्यांज कडे कायम आहे.

६ राजाज्ञा ही पदवी शाके १७६५ सन १८४३ इसवी सालीं बळवंतराव भोसले पंत राजा

ना यांस दिली; हे बळवंतराव भोसले महाराज यांणीं लहानपणापासून वादविलेला मुलगा होय याजला दरमहा सातहजार रुपये व काहीं इनामी उत्पन्न दिलेहोतें; या बळवंतराव भोसल्यास दरमहा पेन्शन ६०० रुपये पावत असतें.

७ शिक्केनिशीसखाराम बल्लाळकान्हेरे यांजकडे पहिले प्रमाणेंच कायम.

८ दप्तरदारी रामचंद्रगंगाधर यांज कडे होती ते मरण पावल्या वर त्यांचे उभयतां चिरंजीवाकडे तें काम शके १७६६ सन १८४४ इसवी या वर्षी सांगितलें.

९ सेनासरखेल पदवी तानाजीराजे शिर्के यांस शके; १७६५ सन १८४३ इसवी यावर्षी दिली; ती त्यांज कडे कायम आहे.

१० पोतनीस रामचंद्र भिवराव होते, ते हल्लीं-कायम आहेत.

---

या महाराजांस स्त्रिया किती होत्या; आणि त्या कोणाच्या ए विषयीं;-

१ वडील स्त्री गजराबाई महाराज ही मुधोजी

राजे महाडिक यांची बहिण ती महाराज अ
सतां शाके १७५६ सन १८३४ इसवी सा
ली मरण पावली.
२ दुसरी स्त्री सगुणाबाई महाराज आई साहेब
ही तानाजीराजे शिर्के यांची कन्या. ती हल्लीं
सातान्यास आहे.
३ तिसरी स्त्री जिजाबाई महाराज माई साहेब
ही लक्ष्मणजी राजे शिर्के यांची कन्या, ती शा
के १७८३ सन १८६१ सालीं मयत झाली.
४ चौथी स्त्री सईबाई महाराज बयासाहेब ही की
र्तसिंग राजे शिर्के यांची कन्या ही महाराज
यांचे पश्चात थोडकेच दिवसांत कैलासवा-
सी झाली.

एणे प्रमाणें होत्या.

या महाराजाचें अंतःकरण दयायुक्त असून औ
दार्य मोठें होतें, श्रीकुळस्वामी जवळ निष्ठा असून
धर्मवासना फार होती, हत्ती, घोडे, जवाहिर, का
पड, व इमारत यांचा शोक मोठा होता, पदरचे
माणसा कडून कारण परत्वें अपराध झाला तरीं
त्याचें नुकसान करण्याची उतावळी नव्हती, शिड

स्तपणा असून धूर्तता फार होती, मुलकातील न्याय इनसाफ रीती प्रमाणें वक्तशीर करून राज्यकारभार जातीचे अकलेनें चालवून इंग्लिश सरकाराची दोस्ती चांगली संपादन केली होती, रयतेस इजा नदेतां मुलखाची आबादी राखलीहोती, व फौजेचा व कामगाराचा वगैरे पगार दरमहाचे दरमहा देऊन हुशार लोक ठेउन सर्व कामांत मोठ्या दक्षतेनें अव्यवस्था होऊं दिली नाही.

या महाराजानीं कितीएक मोठीं औदार्याचीं कृत्यें केलीतीं;—

| | |
|---|---|
| श्रीकृष्णा, वेण्या नदीस पुल बांधले त्यास खर्च रुपये | २५०००० |
| नवावाडा बांधला त्यास खर्च रुपयें, | ५००००० |
| व त्यातील बिलोरी व किनखापी वगैरे सामाना बद्दल रुपये | ४००००० |
| जलमंदिर कुसवा सुध्दां बांधिलें त्यास | १००००० |
| राजाज्ञामुलाचे लग्नास | ७५००० |
| पर्वतेश्वराचे पाण्याचा दुसरा नळ बांधिला त्यास | १००००० |
| अंतकाळापूर्वी दसऱ्याचे दिवशीं पदरचे मंडळीस कापड वांटलें त्यास | १००००० |

या प्रमाणें या महाराजानीं औदार्यपणों ख र्च केला. व प्रतिवर्षी दान धर्म व कापड वगैरे लोकां स देहेनगी फार दिली.

या महाराजांस औरस पुत्र नव्हना ह्मणूनचि मणाजी भोसले सडेकर यांचे चिरंजीव आबाजी भोसले यांचे पुत्रास शके १७७० चैत्र शुध्द द्विती या सन १८४८ इसवीस आपण गादीवर कायम असतां सावधपणानें इंग्लिश सरकाराचे मेहरबा नडाकतर मरीसाहेब यांचे समक्ष दत्तक घेऊन- त्याचें नांव व्यंकोजी महाराज ठेविलें आहे.

या महाराजांनी नवीन इनामगांव जमिनी प दरचे जुने नोकर मंडळीस व आपले गुरु संस्थान चाफळ यास वगैरे प्रतिवर्षास पंन्नास हजार रुप यांचें मोठ्या उदारपणानें करून दिलें तें वंशप रंपरा निरंतर चालण्या सारखें असून त्या लोकां स फार सुखकारक झालें आहे.

कैलासवासी शाहुमहाराज यांचें वृंदावन- माहुली एथे आहे व त्या जवळ चौघडा देऊन त्या चे व पुण्यतिथीचे वगैरे खर्चास सालिना एक ह जार रुपयाचें उत्पन्न खजिन्यांतून नेमून दिलें

आहे. व पुढें इंग्लिशसरकारांतून्चालले आहे; ता
मर्थ या महाराजानीं आपले कारकीर्दीत हरएक
कारणावरमोठा उदारपणा करून सर्व लोकांस सु-
ख देऊन किर्ती मिळविली.

हे महाराज दत्तपुत्र घेतल्या वर कांहीं अ
वकाशानें सावध असतां तेच दिवशीं दोनप्रहर
चे सुमारें कैलासवासी झाले.

आपासाहेब महाराज वारल्या वर त्यांचे द
त्त पुत्र होते; त्यांस इंग्लिशसरकारानें मंजूर के
लें नाहीं; तेव्हां सातारचे राज्यधानीचा अधिका
र इंग्लिशसरकारचें कमिशनंर मेहरबान बारट
ल फ्रियर साहेब यांणीं सर्व कारभार चालविला-
होता.

पुढें शके १७८४ सन १८६२ इसवी पर्यंत-
कमिशनरी अंमल चालून शेवटीं इंग्रज सरका
रांनीं सातारचें राज्य खालसा केलें.

आपासाहेब यांचे दत्तपुत्र व्यंकोजी महाराज
हे सातान्यांत होते; त्यांजला सन १८५७ शके
१७७९ सालांत दंगा झाला; त्या वेळेस संशाया
वरून सातारचे कमिशनरसाहेब यांनीं साता-

त्यानून काढून नेले ते हल्लीं नगर मुकामीं आहे-
त.

समाप्त



# भाग अकरावा.

## सातारकर छत्रपति महाराजां चे प्रतिनिधी यांचे पदाविषयीं.

### इतिहास.

श्रीमंत शिवाजीमहाराज छत्रपति यांणीं राज्य काबीज केलें; तेव्हां त्यांचे बरोबर निराज्जीरावजी हे फार उपयोगी पडलेले होते; ह्मणून जेव्हां- सन १६७४ शके १५९६ या वर्षीं शिवाजीमहाराज यांस राज्याभिषेक झाला; तेव्हां त्यांणीं अष्टप्रधान केलें; त्यांत निराज्जीरावजी यांस न्यायाधिश केलें.

पुढें त्यांचे चिरंजीव प्रल्हादनिराज्जी हे महाराजा कडून गोवळकोंडे एथील बादशाहा कडे वकील होते.

शके १६०२ सन १६८० या वर्षीं शिवाजीमहाराज मरण पावले; आणि संभाजीमहाराज- ( शिवाजीचे वडीलपुत्र ) यांजला मोंगलानीं-

धरून नेऊन त्यांचे दुष्टस्वभावानें त्याजला शके-१६१० सन १६८८ इसवी फालगुन वद्य अमवास्या रोजीं पुण्याजवळ तुळापुरीं मोंगलानीं ठार मारिलें.

संभाजीस मोंगलानीं धरून नेल्या वर पाठीमागें शिवाजीचेधाकटे पुत्र राजाराममहाराज रायगडावर होते ते मल्हादनिराजी यांचे मसलतीनें राज्यकारभार चालवू लागले; परंतु संभाजीचे कारकीर्दींत फार अव्यवस्था होऊन शिवाजीचे वेळचे सरदार मानकरी चोहोकडे गेले यामुळें आणि मोंगलाची फौज सर्व इकडे पसरली; आणि त्यांणीं संभाजीची स्त्री व पुत्र शिवाजी (यासला पुढें शाहू ह्मणूं लागले) यास धरून नेऊनमिरज व पन्हाळा किल्ला घेतला; तेव्हां इकडे राजाराम यांचा मोंगला पुढें ठिकाव लागेना.

असें असतां ह्या प्रसंगीं आपले सरदार जमा करून त्यांचे विचारें राजाराम महाराज चंदीचजाउराकडे शिवाजीचें मावळ होतें तिकडेआपण जाण्या करतां मल्हादनिराजी वगैरे एकवीस मनुष्यें विश्वासू बरोबर घेऊन तिकडे गेले.

चंदी कडे जाण्या पूर्वी व वाटेनें मल्हारनिराजी यांणीं मोठे श्रम केले; हे फार बुद्धिवान ब्राह्मण व चतुर होते; असें महाराजानीं पाहून चंदीस पोंचून आपली राज्यधानी स्थापून स्वस्थता झाल्या नंतर अष्टप्रधानाहून वरिष्ठ असें नवीन पद (प्रतिनिधी) असें कल्पून तें पद मल्हारनिराजी यांस-शके १६१४ सन १६९२ चे सुमारास दिलें. त्यांचा शिक्का अष्टपैलु खालीं लिहिल्या प्रमाणें आहे.

"श्रीलक्ष्मीनृहरेप्रीते ॥ मुद्रा निराजीजन्मनः
राजारामप्रतिनिधे ॥ मल्हारस्यविराजते"

मग शके१६१९ सन १६९७चे सुमारास चंदी वर मुसलमानानी हल्ला करून राजारामसाहेब यांस चंदीतून काढून दिलें; ते वेळेस त्या गर्दीत मल्हारनिराजी ठार मेले.

नंतर राजारामसाहेब जिंजीकडून गुप्तपणें विशाळगड प्रांतीं आले; आणि पुढें रामचंद्र आबाजी बहुतकर यांचे मसलतीनें सातान्यास येऊन राज्यधानी केली; तेव्हां शके १६१९ माघ सन १६९७ चे सुमारास तिमाजी रघुनाथ यांस त्यांचे बापाचे आग्रहास्तव प्रतिनिधीपदाची व

स्त्रें दिलीं; परंतु तेव्हां हे पराक्रमी नाहींत, असें दिसून आलें होतें. या प्रतिनिधीची मुद्रा अशी होती कीं,—

"राजाराम प्रतिनिधे॥ लक्ष्मीकांतप्रसादतः
तिमाजीरघुनाथस्य॥ मुद्राकार्ये विराजिते"

पुढें शके १६२१ सन १६९९ फाल्गून वद्य नवमीस राजाराम महाराज सिंहगडावर मृत्यु पावले; त्यांची स्त्री ताराबाईसाहेब यांणीं आपले पुत्राचे (शिवाजीचे) नांवें राज्यकारभार चालवून आपला मुख्य कारभारी रामचंद्र आबाजी बहुतकर "हुकुमतपन्हा" हा होता.

रामचंद्रपंत हुकुमतपन्हा यांचे कारकून परशराम त्रिंबक किन्हईकर कुळकर्णी यांणीं जेव्हां राजाराम साहेब चंदीकडे गेले तेव्हां मोंगलापासून सातारा, पन्हाळा, परळी, वसंतगड वगैरे किल्ले व मुलुख घेतले; व पुष्कळ फौज जमा करून किल्लेकोट मुलुख काबीज केले; या मुळें ताराबाई यांणीं तिमाजी रघुनाथ यांस दूर करून परशराम त्रिंबक यांस रामचंद्रपंताचे सांगण्यावरून प्रतिनिधी पद दिलें; या प्रतिनिधीचा शि

क्का असा आहे कीं, :-

"श्री आई आदिपुरुष प्रसंन्न: राजाराम स्वामीकृपानिधी: तस्य परशराम त्रिंबक प्रतिनिधी".

यांचे कागदाचे शेवटीं "निदेशासमक्ष" अशीं अक्षरें असून श्रीकाराजवळ "आई आदिपुरुष" अशी अक्षरें आहेत.

या महाराजांनीं पत्र लिहिणें तर वर "राजश्री परशराम पंडित" असें नांव लिहून शेवटीं बहुत काय लिहिणें सूज्ञ असा' लिहिण्याची चाल होती.

राजपत्रा वर यांचा शिक्का कोनाड्यांत होतो या हुद्याचें काम राजाचे हुजूरचे दरकदार घेऊन मुलुकाचा बंदोबस्त ठेवावा; व राज्यकारभार पहावा.

प्रतिनिधीपदाला वस्त्रें वगैरे राजा कडून व्हावयाचीं तीं :-

१ प्रथम भेटी समयीं चादरबादली.

१ पदाचीं वस्त्रें, मंदील एक, जामेवार एक; चादरबादली एक, किनखाप एक, पटका एक.

१ शिकेकटार.

१ शस्त्रें; तलवार एक, ढाल एक.

१ जरीपटका.

१ चौघडा.

१ हत्तीनग तीन.

१ घोडा एक.

१ जवाहिर; शिरपेंच एक; मोत्यांचा तुरा एक; मोत्यांचा चौकडा एक; मोत्यांची कंठी एक; झगा एक.

१ चौरी; सोन्याचे दांडीची.

या प्रमाणें देण्याची चाल होती.

पुढें शके १६२९ सन १७०७ या वर्षी संभाजीचे पुत्र शाहुराजे मोंगलाचे कैदेतून सुटून दक्षिण देशीं आले; त्या वेळेस ताराबाईसाहेब यांणी सर्व सरदारा पासून शपथा घेतल्या की, आपण ताराबाई व तिचा पुत्र शिवाजी यांचा पक्ष स्वीकारूं. आणि शाहूराजे तोतया आहे. यांज कडे आपण मिळणार नाहीं.

अशी शपथ होऊन मग परशराम त्रिंबक आणि धनाजी जाधव ताराबाईचे हुकुमानें शाहुराजाचे पराभवास गंगा तिरीं शाहूराजे होते

तिकडे गेले; तेथें जाधवराव सेनाधिपति त्यांस मिळाले; आणि परशुराम पंडीत प्रतिनिधी पराभव पावले; पुढें शाहूराजे सातान्यास आले; व राज्यकारभार पाहूं लागले; तेव्हां परशुराम त्रिंबक यास धरून कैद केलें; आणि पहिले प्रतिनिधी-प्रल्हादनिराजी यांचे पुत्र गदाधर व नारायण असे दोघे होते; त्या पैकीं गदाधर यास प्रतिनिधी केलें; त्यांची मुद्रा अशी कीं:-

"श्रीशंकर शाहुछत्रपति कृपानिधी, प्रल्हादसुत गदाधर प्रतिनिधी"

पुढें परशुराम प्रतिनिधी हे शाहुछत्रपति यांस शेखमि-या यांचे मार्फत शरण आल्या वर त्यास पुन्हा ती पदवी दिली; ती शके १६१० सन १७३२ पर्यंत त्याज कडे होती.

इतक्यात त्याचा वडील पुत्र कृष्णाराव यास ताराबाईनीं कोल्हापुरास संस्थान करून तेथें ठेविलें होते; त्याणें कांही बंड केलें; यास्तव परशुराम पंडीत हे त्यास अनुकुळ असतील असें जाणून यास काढून गदाधर प्रतिनिधी 'माजी' यांचे बंधू नारायण प्रल्हाद यास प्रतिनिधीची जागा दिली

त्यांणी ती एक वर्ष चालविली; त्यांचा शिक्का असा होता:-

" श्रीमंत त्रिंबक भक्तस्य, शाहू प्रतिनिधी
मम नारायणस्यसुदेय, प्रल्हाद ननुजन्मे "

या समयीं राजश्री कृष्णारावराजा खटावकरया नांवचा मोंगलाचा एक सरदार होता, त्याणें खान देशांत बंड केलें, ह्मणून शाहूराजांनीं परशुरामपं डित यांचा तिसरा पुत्र श्रीनिवासराव यांस तें बंड मोडण्या करतां पाठविलें, तेव्हां त्यांचे तिर्थरूप प रशराम यांणीं त्यास सांगितलें कीं जर तूं या वेळे स जय मिळवशील तर माझी सुटका होईल; या वरून त्याणें मोठा पराक्रम केला. त्या उभयतां ची औंदा जवळ लढाई होऊन श्रीनिवासरावया णें खटावकरांस कैद करून आणलें; तेव्हां शाहूराजा प्रसन्न होऊन त्याचे बापास (परशुराम पंडित) कैदे तून मुक्त करून त्यास प्रतिनिधीची पदवी दिली; ती शके १६३२ सन १७१४ पासून शके १६३८ स न १७१६ इसवी पर्यंत त्यांणीं चालविली. त्यां- ची मुद्रा एणे प्रमाणें:-

" श्री आई आदिपुरुष: श्रीराजा शाहू छत्रप

ति स्वामी कृपानिधीः, तस्य परशुराम त्रिंबक प्रतिनिधी."

परशुराम पंडित यांस शाके १६३८ सन १७१६ या वर्षी देवाज्ञा झाली; मग त्यांचा तिसरा पुत्र श्रीनिवास परशुराम हे शूर असल्या मुळें त्यांस त्या पदवीची वस्त्रें शाहूमहाराज यांणी दिली; यांस श्रीपतराव अथवा रावप्रतिनिधी असें ही ह्मणत.

श्रीनिवास पंडित यांणी शाके १६३९ सन १७१७ पासून शाके १६६९ सन १७४७ पर्यंत ही पदवी, चालविली.

प्रतिनिधीचे वंशांत हे पुरुष मोठे विख्यात व धार्मिक असे होऊन गेले; यांणी दहालक्ष रुपयां च्या जमिनी व गांव मिळून लोकांस इनाम दिले व शाहूमहाराजा जवळ हेच मुख्य कारभारी होते; यांणी कारभार उत्तमरीतीनें चालविला. यमाजी-शिवदेव यांचे मुतालिक होते;

श्रीनिवासराव यांणीं कर्नाटकांत निजामापाशीं लढाया केल्या; कोकणांतील कांहीं किल्ले लढून घेतले; कोल्हापुरचे राजाशीं लढायी करून जय मिळविला. अशा प्रकारें पराक्रम व धर्म या दोन

स्तुत्य गुणानीं यांणीं आपली कि र्ती चिरकाळ क रून ठेवली, पुढें जे अधिकारी झाले, त्यांणी, यांणी केलेला धर्म बुडविला, तथापि अद्यापि बहुत चालू आहे; यांचा शिक्का बापाच्या मुद्रे प्रमाणेच नाव मात्र बदलून तयार केलाहोता; यांची पत्नी राधा बाई. "बहिण एशवदा बाई" ही राजश्री आपाजीरा व कोळेकर देशपांडे यांस दिलीहोती.

यांजला एक मुलगी राजस बाई झाली, ही कडेगावकर देशपांडे राजश्री नागोजीराव यांस दिली होती, यांचे मुख्यत्वें करून राहणें कऱ्हाडा स होतें.

परशुराम पंत यांचा बंधु माधवराव यांसद त्त दिलाहोता, परंतु त्यासच परत घेऊन त्याचें ना व हेंच (श्री निवास परशुराम) चालविलें.

बाजीराव बल्लाळ पेशवे यांचा उत्कर्ष यांचेच कारकीर्दीत झाला, यांचा काळ शके १६६९ सन १७४७ या वर्षी झाला. तेव्हा यांचा कनिष्ट बंधू जगजीवन परशुराम यांस ती पदवी शाहूमहा राज यांणी दिली. जगजीवन यांस दादोबा अ सेंही ह्मणत.

पुढें शाहुमहाराज छत्रपति शके १७६१ सन १७४९ मार्गशीर्ष वद्य तृतीयेस कैलासवासी झाले; त्यांज बरोबर त्यांची पत्नी सगुणाबाई ही सती गेली; आणि बाळाजी बाजिराव पेशवे यांणीं राजमंडळ तोडून टाकिलें; या कामांत दादोबा हे हर्कत करूंलागले; व त्यांणीं व त्यांचे मुतालिकयानें "सागोळे" घेतलें, तेव्हां भाऊसाहेब यांणीं त्या उभयतांस धरून किन्हईच्या किल्ल्यांत टाकिलें, पुढें दोन वर्षांनीं सर्व बंदोबस्त झाल्या वर सोडलें; ते पुढें शके १६७३ सन १७५१ या वर्षी मरण पावले, त्यांच्या स्त्रिया मैनाबाई व सुंदराबाई यास विटेगांव अन्नवस्त्रा करतां देऊन तेथें ठेविल्या होत्या.

जगजीवन पंडीत मेल्या वर कृष्णाजी परशुराम यांचा नातू श्रीनिवास गंगाधर हा वडील घराण्यांतील ह्मणून शके १६७३ सन १७५१ या वर्षी रामराजे यांणीं श्रीनिवास यांस पदाचा अधिकार दिला, व वस्त्रें ही दिलीं; त्यांणीं शके १६८४ सन १७६२ पर्यंत ती पदवी चालविली यांस भवानराव असें ही ह्मणतात.

पुढें पानपतचे लढायींत सदाशिवराव भाऊ पेशवे पडले; व बाळाजीपंतनाना पेशवे हे हीक्षय रोगानें पर्वतीस मरण पावले;

मग माधवराव बल्लाळ लहान; या मुळें सर्व कारभार राघोबा दादा यांज कडे आला; तेव्हां त्यांचे कृपेंतील नारोशंकर राजेबहादर यांस त्यांणीं प्रतिनिधी पदाचीं वस्त्रें महाराजा कडून देवविलीं आणि भवानराव यांस काढून टाकिलें; ही पदवी राजेबहादर यांणीं एक वर्ष भोगली.

नारोशंकर यांणीं राजश्री गोपाळराव मिरजकर यांशीं लढून मिरज घेतली; तेव्हां भवानराव व गोपाळराव हे बंड करीत करीत हैदराबादेस गेले त्यांचे बरोबर गमाजीयमाजी मुतालिक होते; हे "निजामाचे दिवाण राजश्री विठुल सुंदर यांचे व्याही" या मुळें त्यांणीं त्यांचा पक्ष धरून फौजे सह पेशव्या बरोबर ते लढण्यास आले; राक्षस भुवना वर यांची व त्यांची लढायी होऊन पेशव्यानीं त्यांचा पराभव केला; परंतु मिरजकर व भवानराव यांची समजूत करून त्यांस परत आणलें; आणि त्यास (भवानराव यास) पु

न्हा प्रतिनिधी ही पदवी दिली. पुढें पेशवे सरकारचा आग्रह पडला कीं प्रतिनिधीनीं पुण्यास राहावें; ती गोष्ट भवानराव यांणीं केली नाहीं; ह्मणून कृष्णाराव यांचा दुसरा नातू भगवंतराव त्रिंबकयांस प्रतिनिधीचीं वस्त्रें देऊन पुण्यांत ठेविले; पुढें भवानराव राजी झाल्या वरून शके १६९० सन १७६८ या वर्षी पुन्हा भवानराव यांस पद व वस्त्रें दिलीं; आणि भगवंतराव यांज कडे खानापूर वगैरे जाहागिर ठेवली, भवानराव व भगवंतराव या उभयतांच्या नेहमी खानापूर प्रांती लढाया होत या मुळें पेशव्यानीं त्यांस कांहीं जहागिर देऊन निराळेंच ठेविलें.

भगवंतराव शके १६९७ सन १७७५ या सालीं मरण पावले; त्यांच्या स्त्रिया राजसबाई व सकवार बाई यांस दहा हजार रुपये नेमणूक करून विटें एथें ठेविल्या.

सदरहू प्रमाणें भवानराव यांणीं शके१६९० सन १७६८ पासून पदवीचा निर्वेधपणीं उपभोग केला; पुढें नारायणराव पेशवे यांस राघोबा दादानीं ठार मारलें; तेव्हां हे नानाफडणवीस

यांस मिळाले, या कारणा मुळें त्यांचे बस्तान चांगलें बसलें.

पुढें हे तारीख ३१ आगष्ठ सन १७७७ शा के १६९९ या वर्षी मरण पावले, तेव्हां त्यांच्यास्त्रिया यमुनाबाई व काशीबाई अशा दोन होत्या, त्या पैकीं काशीबाई ही भ्रतार वारले, त्याचदिवशीं प्रसूत होऊन तिला पुत्र झाला, त्या पुत्राचें नाव परशुराम पंडित असें ठेविलें, आणि त्याजला महाराजांनी वस्त्रें पाठवून दिलीं

त्या वेळेस नानाफडणीसानीं कृष्णारावजोशी सातारकर यांस कारभारी नेमून बंदोबस्त ठेविला

हे परशुराम पंडित खडर्याचे लढायींत होते, पुढें नानाफडणवीस यांची कारकीर्द सरली व कारभारी ठरले, आणि खासप्रतिनिधी मुकत्यार झाले, इकडे पुण्यास बाजिराव गादीवर आले.

परशुरामपंडित हे फार दुरवृत निघाले यांचें आईशीं व बायकोशीं फार वेर पडलें, रमातेलीण हिजला जवळ ठेऊन रामोशीलोक चाकरीस ठेविलेहोते, मुलखात दंगेदरवडे घाल

ण्यास आरंभ केला; आईनें व तिचे कारभारी बळवंतराव फडणीस याणीं बहूत उपाय केले, परंतु त्यांचे तें व्यसन जाईना. भांग फार प्यावी मुलुख लुटून पैसा काढावा; वाटा माराव्या; माणसांचे नाकांत व कानांत दारू घालून माणसें मारावीं; अशीं दुष्टकर्मे चालविलीं. हलकीं माणसें जवळ असून गवई व तमासगीर या लोकांत सर्व काळ बसावें; त्यांच्या स्त्रिया लक्ष्मी बाई व रमाबाई ह्या पळून जाऊन विशाळगडावर राहिल्या. शेवटीं बाजीरावप्रधानयाजकडे आईनें बोभाट नेल्यावर बाजीगणेश गोखले यास बंदोबस्ता करतां नेमिलें; त्याणें फौजे सुध्दां जाऊन मस्करेस परशुराम पंडीत याशीं लढायी केली; तींत पंडीत यांचा हात तुटून त्यास गोखले याणीं कैद करून पुण्यास आणून ठेविलें.

पुढें त्याचीनाटकशाळा "रमानेलीण" इणें दंगा करून वासोटा किल्ला लढविला; शेवटीं तिला ही कैद करून पुण्यांत आणून ठे

विलें. तेव्हां प्रतिनिधीचा सर्व मुलुख जप्त झाला, पैकीं म्हसवड वगैरे गोखले यांस दिला व कांहीं पेशवे सरकारांत घेतला. या प्रमाणें शके १७२९ सन १८०७ यांत झालें.

प्रतिनिधी कडे तीन हजार स्वाराचें पथक होतें. त्यांज कडे पुष्कळ किल्ले होते. सर्व मिळून अठरा लक्षांचा मुलूख होता, "हल्लींचा सगळा साताराजिल्हा हा पंतप्रतिनिधी यांज कडे होता" दरमहालांत शेंकडा निमे. असे प्रतिनिधी घेत असत. कितीएक महाल होते. त्यांत प्रतिनिधीचे हिस्श्यास जिल्हेबाब असें नाव आहे; बाकी राहिलें त्यास हुजूरमामला हीं नांवें अद्याप चालत आहेत.

## प्रतिनिधी कडील मुख्य किल्ल्याचीं नांवें.

| | | |
|---|---|---|
| १ व्याघ्रगड. | १ सुंदरगड. | १ प्रतापगड. |
| १ नांदगिरी (कल्याणगड | १ मकरंदगड. | १ महिपतगड |
| | १ भूषणगड | १ वर्धनगड. |
| १ वसंतगड. | १ गहनगड. | १ सज्जनगड. |

| | | |
|---|---|---|
| १ केंजळामनमो | १ मोरगिरी(गु | १ जंगलीजय- |
| १ हनगड. | णवंतगड) | गड. |
| १ महिमानगड | १ गंभिरगड. | १ महिमदनगड |
| १ मचिंद्रगड. | १ वारुगड. | १ सूषेणगड. |
| १ अवचितगड | १ बहिरवगड. | |
| १ संतोषगड. | १ मंगळगड. | |

## प्रतिनिधीकडे महाल हो-तेते.

| | | |
|---|---|---|
| १ कर्यात विटें. | १ कर्यात निम | १ सुभा वाई. |
| १ सुभा सातारा | सोळ. | १ प्रांत खटाव. |
| १ सुभा कऱ्हाड. | १ हवेली विजा | तर्फ किन्हई. |
| १ कर्यात औंद. | पूर. | १ रुळी, बुंदेलखं |
| १ तर्फ कोळें. | १ कर्यात कासे | डांत. |
| १ कर्यात मालव | गांव. | १ तर्फ वारुण. |
| णी. | १ सुभाजावली | १ कर्यात आठ |
| १ कर्यात नाजरें | १ नरसिव्हगड. | पडी. |
| १ बागेवाडी. | १ कर्यात वेळापूर | १ खानापूर. |

या शिवाय उत्तर हिंदुस्थानांतकाही गांव होते

पुढें सन १८१२ शके १७३४ यांत बाजीराव प्र धान याणीं असें ठरविलें कीं, प्रतिनिधीनी परत कऱ्हाडास जावें; आणि त्यास दोनलक्षाचा मुलुख मात्र द्यावा; मग वाईटसाईट गांव देऊन भरती केली; ती अशी;—

१४ कऱ्हाड पैकीं चौदागांव व अम्मल.
१४ कर्यात औंद पैकीं चौदागाव व अम्मल
१ बाबती विजापूर पैकीं.

---

इतक्याचा वसूल हल्लीं साठसत्तर हजार रुपये येत आहे.

या प्रमाणें सरंजाम मिळाल्या वर प्रतिनिधी पुन्हां परत कऱ्हाडास गेले, परंतु त्याचे वृत्तीची सुधारणा नहोतां; तसाच घोळ चालला-होता, पुढें सन १८१८ शके १७३९। ४० सालीं पेशव्यांचे राज्य बुडालें; तेव्हां प्रतिनिधी यांस सातारचे छत्रपति यांचे निसबती कडे नेमून दिले; तेव्हां पासून त्या पुरुषाची गडबड राहिली; व इंग्लिश सरकाराचे धाकानें गरीबीनें वागत असत; तथापि मरे पावेतों त्यांणीं

स्त्रियाची भेट घेतली नाहीं.

तारीख १० माहे मे सन १८४८ शके १७७० वैशाख शुध्द अष्ठमी या वर्षी परशराम पंडीत मरण पावले. तेव्हां त्यांचे भाऊ बंदा पैकीं- एक मुलगा दत्त दिला; तो छत्रपति व इंग्लिश सरकारानें मान्य केला; आणि त्यांजला शाहाजीराजे आपासाहेब यांणीं पदाचीं वस्त्रें पाठवून दिलीं, त्याचें नांव श्रीनिवास पंडीत हे हल्लीं गादीवर आहेत.

यांचे कारकीर्दीत कांहीं दुअमली गाव होते ते सरकारांत घेतले. आणि मुबदला दिलेया खेरिज कांहीं लिहिण्या जोगें झालें नाहीं. यांस स्त्रिया दोन आहेत.

श्रीनिवास पंडित यांजला दोन पुत्ररत्नें आहेत; त्यांत एक पुत्राचें वय सुमारें सहा वर्षाचें आहे; या वरून त्या पुत्राचा जन्म शके १७७९।८० सन १८५७ या वर्षी असावा. यांचा वृतबंध सालमजकुरीं झाला. ( सन १८६४ शके १७८५ फालगून मासीं.

दुसरा धाकटा एक मुलगा आहे; त्यांचा

जन्म शके १७८३ या वर्षी झाला असावा. या खेरिज यांजला एक मुलगी आहे.

या प्रमाणें यांजला संतति व संपत्ति अनुकूळ आहे, यांचे पिढीजाद भवानीदेवीचा उत्छाह करण्याचा प्रघात आहे, हा उछाह अश्विनमासीं होत असतो.

सन १८६२ इसवी शके १७८४ या वर्षी श्रीमंत श्रीनिवास पंडित यास "जेव्हां प्रसंग पडेल तेव्हां त्यांणीं व त्याचे दौलत चालविणारे संततीस दत्त घेण्याची परवानगी आहे ह्मणून" कलकत्त्याचे गवरनरजनरल व्हॉयस्राय लॉर्ड क्यानिंग यांणीं सनद पाठविली; ती आभारपूर्वक प्रतिनिधी साहेबानीं स्विकारली.

श्रीनिवास पंडीत सुशील आणि सदाचार संपन्न आहेत.

यांस सर्व शक्तिमान् जो इश्वर याचे इच्छेनें पुत्र रत्नें आहेत, व दौलत प्राप्त झाली आहे, यांणीं आपले पुत्रास उत्तम विद्याभ्यास व निती प्रवीण करावें, कीं त्यांजला विद्ये-

नें हल्लींचे राज्य करते यांज पासून मोठा अधिकार प्राप्त होईल, आणि ते प्रजेचें पाळण यथान्याय करतील.



समाप्त.



## भाग बारावा.

## सातारचे छत्रपति महाराजयांचे मुख्य प्रधान पेशवे, (अष्टप्रधानांतील पहिले,) यांचा संक्षिप्त इतिहास.



श्रीमंत शिवाजीमहाराज छत्रपति यांणीं मराठी राज्याची स्थापना केली तेव्हां प्रथम मावळे लोक व मराठेलोक व मानकरी वगैरे पुष्कळ चांगलीं माणसें जमवून मुलुख व किल्ले काबीज केले. त्यांत शके १५७८ सन १६५६ इसवीचे सुमारास कोयनानदीचे काठीं जो शिवाजीनीं मुलुख घेतला होता, त्याचे संरक्षणा साठीं "त्या वेळेस शिवाजीचे लष्करांत त्यांचे भरवशाचा-कारकून शामराजनिळकंट रांजेकर या नांवाचा होता, त्यास पेशवे पद देऊन फौजेची सरदारी दिली." आणि ठेविलें.

नंतर शके १५८० सन १६५८ चे सुमारास कोकणपट्टी घेण्या करतां शिवाजीनी शामराज पंत पेशवे यांस पाठविलें त्यांज बरोबर फत्ते खान ह्मणून मोंगलांचा सरदार होता त्याणें लढायी करून पेशव्यांचा पराभव केला.

हें वर्तमान ऐकून शिवाजीचे लश्करांत मोरो त्रिंबक पिंगळे फार चतुर व शूर होते त्यांजला पेशवे पदाचा अधिकार देऊन शामराज पंत याज कडून तें पद काढलें मोरोपंत यांस शिवाजीनीं पायदळाचा सरदार केला होता.

शके १५८४ सन १६६२ ईसवीस पायदळा चे सरदार पिंगळे याणीं जुनराचे उत्तरेकडील कितीएक मुलुख घेतला.

शके १५८९ सन १६६७ ईसवी सालीं शिवाजी दिल्लीस गेले तेव्हां पाठीमागें मुलकाचा सर्व बंदोबस्त ठेवण्यास मोरो त्रिंबक पिंगळे पेशवे व आनाजी दत्तो व आबाजी सोनदेव यांस मुख्य ठेविले हाते.

शके १५९० सन १६६८ इसवीचे सुमारास शिवाजीनी काहीं नवे कायदे करून मुलकाचा

व फौजेचा बदोबस्त केला तेव्हां मोरोपंत पिंग ळे पेशवे यांणी सर्व चौकशी करावी असें ठर विलें.

मग शके १५९१ सन १६६९ चे सुमारास अ वरंगजेब बादशाहा कडून दक्षिणेंत मोहबतखा न मोठी फौज घेऊन आले त्याचा पराजय प्र तापराव गुजर व मोरोत्रिंबक पिंगळे पेशवे यां णी केला.

पुढें शके १५९६ सन १६७४ या वर्षी शिवा जीमहाराजास राज्याभिषेक झाला तेव्हां अ ष्टप्रधानाची नांवें संस्कृत भाषेत ठेविलीं, त्यांत पेशवे यास मुख्य प्रधान असें नांव दिलें.

या नंतर शके १६०२ सन १६८० या वर्षी शि वाजीमहाराज कैलासवासी झाले, पाठीमागें आनाजी दत्तो सचीव व मोरोत्रिंबक पिंगळे या उभयतांचे परस्पर वैमनस्य आलें, नंतर संभा जीमहाराज तक्ताधिपति झाल्या वर त्यांणीं आ पला मुख्य कारभारी कलुशा ( कनुजा ब्राह्मण होता. ) त्यास केले आणि मोरोत्रिंबक पिंगळे यांस कैदेंत ठेविलें.

शके १६३० सन १७०८ इसवी या वर्षी शाहू महाराज तक्ताधिपति झाले, तेव्हां त्यांणीं मोरो त्रिंबक यांचे चिरंजीव बहिरो मोरेश्वर यांस प्रधान केलें.

धनाजीजाधव सेनापति यांचे पदरीं बाळाजी विश्वनाथभट चौलप्रांतांतील श्रीवर्धन गांवचेराहणारे हे कारकुनीचे कामावर होते. त्यांजवरजाधवराव यांची मर्जी असून ते कामकाजांत विश्वासू व फार हुशार होते.

धनाजीजाधव वारणानदीचे काठीं आजारी होऊन मृत्यु पावले, तेव्हां त्याचें पद त्यांचे चिरंजीव चंद्रसेनरावजाधव यांस शाहूमहाराजानीं दिलें. परंतु अधिकार बाळाजिविश्वनाथ संभाळूं लागले. या मुळें चंद्रसेनराव बाळाजिविश्वनाथ यांचा द्वेष करूंलागले.

शके १६३० सन १७०८ ईसवीचे सुमारास शाहूराजानें आपले फौजेच्या दोन टोळ्या केल्या; एक, बहिरोपंत पिंगळे पेशवे प्रधानयांज बरोबर देऊन त्यांस कोंकण परगण्यांत कल्याणप्रांत रक्षण करण्यास सांगितलें, आणि

दुसरी टोळी बाळाजिविश्वनाथ ( सेनापतिजा धव यांचे कारकून ) यांज बरोबर देऊन शंभूम हादेव डोंगराकडे मोंगलाकडील कृष्णाराव राजा खटावकर बंड करून उपद्रव करीत होता त्यांचे बंदोबस्तास पाठविलें, त्यांज बरोबर पर शुराम त्रिंबक प्रतिनिधी यांचा तिसरा पुत्र श्रीपतराव हाही होता.

या दोनी लश्कराचे अधिकाऱ्यांपैकीं बाळाजिविश्वनाथ यांणीं मोठा पराक्रम करून कृष्णरावराजा धरून आणला, व बंदोबस्त केला. व बहिरोपंत पिंगळे पेशवे यांणीं आंग्रे यांजबरोबर लढायी केली; त्या लढायींत आंग्रे यांणीपेशवे यांस धरून कैदेंत ठेविलें.

नंतर आंग्रे यांचे पराभवासाठीं बाळाजिविश्वनाथ यांस शाहूराजानें पाठविलें, तेव्हां त्यांणीं कोंकणांत जाऊन आंग्रे याशीं तह करून बहिरोपंत पिंगळे पेशवे यांस सोडवून आणलें.

या प्रकारें जय मिळवून बाळाजिविश्वनाथ आले; तेव्हां शके १६३० सन १७०८ यावर्षी

त्यांजला पेशवे ( मुख्य प्रधान ) पदाचा अधिकार शाहुराजानें दिला; आणि बहिरो मोरेश्वर यांज कडून अधिकार काढला; तेव्हां ते आपले घरीं बसले; त्यांज कडे प्रतापगड एथील देवीचे संस्थान चें काम मात्र होतें; तें अद्याप त्यांचे वंशा कडे आहे.

बाळाजिविश्वनाथ यांस पेशवेपणाचा अधिकार दिला; तेव्हां आबाजी पुरंदरे मुतालिक व रामचंद्रपंत भानु फडणवीस हुजुरूननेमून दिले.

मग मोंगलाचा सरदार "बाजीम" पुण्यास आलाहोता; त्यांचा बाळाजिविश्वनाथ याणीं पराभव करून पुणेंपरगणा घेतला तेव्हां पासून बाळाजि विश्वनाथ यांचे प्राबल्य फार वृध्दिस पावलें.

पेशवे याणीं सर्व फौजेचा व मुलकाचा बंदोबस्त करावा; दुसरे प्रधान व दरकदार यांस घेऊन कारभार करावा. असें या पेशव्याचें ( मुख्यप्रधानाचे ) महाराज सरकारांत काम आहे.

राजपत्रावर पेशवे यांची निशाणी "कोनाड्यां त शिक्का व चिकट बंदावर मोर्तबें होत असत.

महाराजानीं पेशवे यांस पत्र लिहिणें; तर प्रथम "राजश्री बाळाजि विश्वनाथ पंडित" असें लिहून शेवटीं "बहुत काय लिहिणें सूज्ञ असा" असें लिहिण्याची चाल होती.

पेशवे यांस महाराजाकडून पदाधिकाराचीं वस्त्रें व जवाहिर व नग वगैरे द्यावयाचे ते;

१ प्रथम भेटीसमयीं चादर.

पदाचीं वस्त्रें.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | मंदील; | १ | चादर बादली. |
| १ | जामेवार | १ | किनरवाप. |
| १ | पटका. | | |

एकूण पांच; मिळावयाची.

१ शिक्केकटार.

१ शस्त्रें; तलवार, एक; ढाल एक.

१ जरीपटका.

१ चौघडा.

१ हत्ती नग तीन.

१ घोडा एक.

१ जवाहिर, दागिने पांच.

१ शिरपेंच.

१ झगा.

१ कंठी मोत्याची.

१ तुरा मोत्यांचा.

१ चौकडा मोत्यांचा.

---

१ चौरी सोन्याचे दांडीची.

१ कलमदान.

---

या प्रमाणें देण्याची चालहोती

बाळाजि विश्वनाथ याणें व पुढें त्याचे वंशज यांणीं मोठ मोठे पराक्रम करून फार विख्यात झाले, व त्याचे पदरीं " शिंदे," होळकर, गायकवाड, भोसले, असे मोठे सरदार उदयास आले आणि स्वतंत्र राज्य स्थापिलें. त्या सरदारा सह पेशव्याचा इतिहास तारीखवार छापला तरस्वतंत्र मोठें एक पुस्तक होईल आणि तसा इतिहास (मराठे याचें बखरेंत) आहेच, तितकी स

र्व हकिकत या लहानसे पुस्तकांत घेण्याचा इरादा नाहीं आणि जरूर व सवड ही नाहीं, अगदीं संक्षिप्तरीतीनें प्रधान यांचे कारकीर्दीत मुख्य गोष्टी काय काय घडल्या, इतक्याचें वर्तमान या पुस्तकांत घेऊन, पुढें बाळाजिविश्वनाथ यांचे कारकीर्दी पासून लिहिलें आहे



## कारकीर्द बाळाजिविश्वनाथ पेशवे (मुख्यप्रधान) यांची.

बाळाजिविश्वनाथ यांस पेशवेपदवी दिल्या वर यांचे मित्र त्या वेळेस धनाजिसेनापति यांजवळ कारकुनीचे कामा वर होते; त्यांजला पेशवे यांची मुतालकी दिली. व रामचंद्रपंत यांस फडणिशी दिली. हे दोन दरक हुजूरून नेमिले. — पेशवे यांणीं मोठमोठे पराक्रम केले, त्याचा विस्तार आहे, त्यांत मुख्यकारण एक असें आहे कीं, त्यांणीं फोजेसह दिल्लीस जाऊन पातशाहाकडून शाहूकरतां दक्षण देशांतील स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी

च्या वगैरे सनदा घेऊन आले तो प्रकार विस्ता र पूर्वक शाहूमहाराजाचे कारकीर्दीत लिहिला च आहे.

पुढें काहीं दिवसानीं बाळाजिविश्वनाथ यांस शके १६४२ सन १७२० ईसवी या वर्षी देवाज्ञा झाली. तो पर्यंत त्यांची कारकीर्द सहा वर्षे वागली त्यांस दोन पुत्र होते; त्यांत वडील बाजीराव आणि धाकटे चिमणाजी आपा होते.

---

## कारकीर्ददुसरी
## बाजिरावबल्लाळ पेश
## वे यांची.

बाजिराव बल्लाळ यांस शाहूमहाराजानीं शके १६४२ सन १७२० या वर्षी पेशवेपणाची पदवी दिली.

या बाजीराव पेशव्यानीं मोठ मोठ्या लढा या करून फार पराक्रम केला; त्यांतून एक लढा यी बडोद्यासवळ त्रिंबकराव दाभाडे सेनापतियां शीं करून त्यांस ठार मारून जय मिळविला; व आणखीं त्यांणीं नबाबसरकाराशीं दोन लढाया करून त्याज पासून पाहिजे तसा करार करून- घेतला; आणि फौजेसह हिंदुस्थानांत स्वाऱ्या क रून खंडण्या घेतल्या.

दिल्लीच्या बादशाहा पासून गुजराथ आणि माळवा या दोन प्रांतांतील सरदेशमुखी व चौ- थाई संपादन केली; व निजामउल्मुलुख यां च्या असा पराभव केला की त्याजला माळवा प्रांत सो डून देणें प्राप्त झालें.

या पेशव्याचे कारकीर्दीत होळकर, शिंदे, गा यकवाड हे तिघे सरदार उत्कर्ष पावले; व पर सोजी भोसले यांचे वंशांतील रघोजी भोसले यां स सेनासाहेब सुभा ही पदवी दिली. व वराड प्रां तांतील नागपूर संस्थान दिलें.

बाजीराव बल्लाळ यांचे धाकटे बंधू चिमणा जीआपा हे फार शूर असून त्यांणीं आपले बं धूस लढायीचे वगैरे कामांत बहुत मदत देऊन फार उपयोगी पडले होते; व पोर्तुगाल देशाचे लो कांच्या स्वाधीन साष्टी बेट होतें, तें त्या लोकांशीं

युध्द करून घेतलें; या मुळें चिमणाजीआपा यांची फार कीर्ती झाली; ते चिमाजीआपा बाजिराव यांचे पश्चात् शाके १६६३ सन १७४१ या वर्षी मृत्यु पावले. त्यांस एक पुत्र होता;त्याचें नांव सदाशिव चिमणाजी होतें.

बाजीराव पेशवे मोठे शूर असून युध्दाचे कामांत फार कुशल व रूपानें फार उत्तम होते, त्यास पुत्र तीन होते. त्यांत वडील बाळाजिबाजीराव त्यांस लोक नानासाहेब म्ह णत होते दुसरे रघुनाथबाजी, तिसरे, जनार्दन बाबा-होते,ते, लहानपणीच मृत्यु पावले;

बाजिराव बल्लाळ यांस शाके १६६२ सन १७४० या वर्षी देवाज्ञा झाली. तों पर्यंत त्याची कारकीर्द वीस वर्षे चागली.

---

## कारकीर्द तिसरी.
## बाळाजिबाजिराव उर्फ नानासाहेब पेशवे यांची.



बाळाजिबाजीराव पेशवे यांस शाके १६६२

सन १७४० इसवी या वर्षी पेशवे पदवी शाहूमहाराज यांणीं दिली.

पुढें शके १७६१ सन १७४९ इसवीस शाहूमहाराज मरण पावले, तेव्हां रामराजे सातारचे गादीवर बसले, त्या वेळेस पेशवे-यांणीं राजमंडळ तोडून सर्व राज्यकारभार आपण करूं लागले.

या पेशव्याचे कारकीर्दीत फौजेचें काम बाजिराव बल्लाळ यांचे धाकटे बंधु रघुनाथराव यांजकडे होतें; आणि राज्यकीय संपूर्ण काम त्यांचे चुलत बंधु सदाशिव चिमणाजी उर्फ भाउसाहेब यांजकडे होते.

या पेशव्याची राज्यकीयकामांत फारच चतुराई होती, यांचे कारकीर्दीत सदाशिवराव चिमणाजी ऊर्फ भाऊसाहेब यांणीं मुलकाचा बंदोबस्त करण्यास रामचंद्रबाबा शेणवी यास नेमलें होतें, त्यांणीं तो बंदोबस्त उत्तम प्रकारचा ठेविलाहोता, तो असा कीं, शिवाजी महाराज यांचे पश्चात् जी अव्यवस्था झाली होती; ती मोडून टाकून सुधारणुक चांगले प्रकारें केली.

यांचे कारकीर्दीत हिंदुस्थानांततीनस्वा-

ऱ्या मोठ्या झाल्या; त्यांत दोन स्वाऱ्या रघुनाथ राव यांणी केल्या. त्यांतून दुसरे स्वारीचे वेळेस पंजाब एथें जाऊन गीलच्या सुभेदार घालवून देऊन आपला अम्मल बसविला. आणि वसूल करण्यास शिंदे व होळकर यांज कडील लोक ठेविले;

तिसरी स्वारी अहमदशाहा अबदाली यांज वर बाळाजि बाजीराव यांचे पुत्र विश्वासराव व चुलतबंधु सदाशिवराव चिमणाजी या उभयतांनी केली; तेव्हां त्यांणीं आपले बरोबर होळकर व शिंदे व गायकवाड वगैरे पुष्कळ सरदार नेले होते; त्या वेळेस एकंदर फौज पंचावन्न हजार स्वार व दोनशें तोफा व पायदळ पंधरा हजार व बाजारबुणगें दोनलक्ष या प्रमाणें जमाव होता; तो थाट असा होता कीं, अवरंगजेब बादशाहाचे कारकीर्दी पासून असा कधीही कोणी पाहिला नाहीं. त्यांचे शत्रूची हीअशीच फौज होती. परंतु पायदळ कांहीं अधिक व स्वार कांहीं कमी होते, ही लढायी सोनपतपानपतची ह्मणोन प्रख्यात आहे; ही लढायी शके १६८३ सन १७६१ या वर्षी झाली, त्या वेळेस पेशव्याचे फौजेंत धान्यादि सामुग्रीचा तोटा पडल्या मुळें त्या लढायींत पेशव्यांचा मो

ड होउन सुमारें दोन लक्ष माणसें मेली, विश्वा
सराव पेशवे यांस असाध्य जखम लागून पडले
हें वर्तमान भाऊसाहेब यांस कळतांच हत्तीवरून
घोड्यावर बसून लढायींत शिरले, ते पुन्हां दृष्टी
स पडलेनाहींत; गोविंदपंत बुंदेले व गणपतरा
व मेहेंदळे हे रणभूमीवर ठार मारले गेले, जन
कोजी शिंदे व पेशव्यांचे पायदळाचा सरदार इ
ब्राहीमखान गारदी या दोघांस शत्रूनीं धरून ने
ऊन ठार मारले, मल्हारराव होळकर व दमाजी
गायकवाड व विठ्ठल शिवदेव विंचूरकर व राजे
बहादर व नानाफडणवीस हे पळून माघारे आले
त्या लढायींत जे लोक मेले, त्यांच्या शोकानें सं
पूर्ण दक्षिणदेश व्यापून गेला; शत्रू गिलच्या
यांणीं क्रूरत्व असें केलें कीं, जीं माणसें पळणीत
सांपडलीं, त्यांतून बायका व मुलें खेरिज करूनस
र्वांस मारून टाकलें, आणि बायकांस बटकी व मु
लांस गुलाम करून ठेविलें.

या लढायीचें दुःखकारक वर्तमान बाळाजि
बाजीराव पेशवे यांणीं ऐकल्यावर फार दुखणा-
ईत झाले होते. यांचे कारकीर्दीत मराठीराज्याचा

उत्कर्ष झाला होता, त्यांचा या लढायीत फार नाश झाला; त्यांची पूर्व स्थिति होण्यास फार दिवस लागले.

या पेशव्यास दोन पुत्र होते; त्यांत वडील माधवराव बल्लाळ आणि धाकटे नारायणराव बल्लाळ.

बाळाजि बाजीराव पेशवे सन १७६१ शके १६८३ या वर्षी मरण पावले; त्यांची कारकीर्द एकवीस वर्षे चालली.



## कारकीर्द ४थी.

### माधवराव बल्लाळ पेशवे यांची.



या माधवराव बल्लाळ पेशवे यांस शके १६८३ सन १७६१ इसवी वर्षी पेशवेपदाचा अधिकार रामराजे महाराज याणीं दिला.

या पेशव्याचें धैर्य आणि खरेपणा हे दोन गुण मोठे होते; त्यांणीं रयतेस पीडा देणारे व वाईट आचरणाने वागणारे लोकांस शासन करून गरीबलोकांचें संरक्षण चांगलें के

लें. आणि राज्यकारभार जातीचे अकलेनें य थास्थित चालविला होता.

या पेशव्याचें शूरत्व आणि राज्य करणे विषयीं कुशलत्व फार होते; आणि यांचे चु लते रघुनाथराव दादा हे फार शूर होते, परंतु राज्यकीय कामांत अगदीं उपयोगी नव्हते; व पेशवाईची गादी आपणास प्राप्त व्हावी, अ शी यांची इच्छा फार होती; या मुळें त्यांचें आ णि माधवराव यांचें फार वैमनस्य पडुन रा घोबा दादास कैद करून ठेविलें होतें.

या पेशव्याचे कारकीर्दीत कारभारी स रवा राम बापू वगैरे होते; त्यांतून पुढें बाळा- जिजनार्दन भानू उर्फ नाना फडणीस हे फा र प्रसिध्दिस आले.

या माधवराव बल्लाळ पेशव्यास क्षयरो ग लागून थेऊर गांवीं शके १६९४ सन १७७२ या वर्षी मरण पावले; त्यांस औरस पुत्र नव्ह ता. त्यांचे मरण काळीं शिंदे, होळकर, गायक वाड वगैरे सुध्दां एकंदर कमाल आकार दहा कोटी रुपयांचा मुलूख होता; व वसूली सात कोटी रुपयांचा मुलुख होता.

## कारकीर्द पांचवी.

## नारायणराव बल्लाळ पेशवे

## यांची.

या नारायणरावास शके १६९४ सन १७७२ इसवीस त्यांचे बंधु मरण पावल्या वर पेशवेपद वीचीं वस्त्रें रामराजेमहाराज याचे हातून झालीं

यांस वस्त्रें झालीं, तेव्हां सरकारांतून बजाबा पुरंदरे दिवाण व बाळाजिजनार्दन उर्फ नानाफड णवीस हे दोन दरकदार होते. ते कायम केले.

या पेशव्यानीं अधिकार आठ महिने केला. म ग त्याचे चुलते राघोबादादा यानीं मारेकरी गार्दी याचे हातून त्याजला ठार मारविलें. आणि आ पण पेशवाईचे गादीवर बसले. त्यास ही साता-न्याहून वस्त्रें झालीं, त्या वेळेस संपूर्ण कारभा-री लोकांच्या मनांत संशय उत्पन्न होऊन त्यास गादी वरून काढून टाकण्याचा यत्न केला.

---

## कारकीर्द सहावी.

## माधवराव नारायण उर्फ सवाईमाध वराव पेशवे यांची.

या पेशव्याचे तीर्थरूप नारायणराव साहे

व मरण पावले, तेव्हां त्याचे वय अठरा वर्षांचें होतें, त्यांची स्त्री गंगाबाई गरोदर होती. ती कारभारी लोकांनीं पुरंदर किल्ल्या वर नेउन ठेविली होती ती तेथें प्रसूत होऊन पुत्र झाला, त्याचें नाव सवाई माधवराव ठेविलें.

मग त्या मुलास चाळीसावे दिवशीं सातान्याहून रामराजेमहाराज याज पासून वस्त्रें आणून पेशवाईचे गादीवर स्थापिलें, आणि संपूर्ण राज्याचा कारभार आपण नानाफडणवीस करू लागले.

पुढें राघोबादादा याणीं आपल्यास अनुकूळ करून घेण्याविषयीं इंग्लिश लोकां कडे जाऊन पुष्कळ यत्न केला. परंतु साध्य झाला नाहींनंतर कोपरगांवी जाऊन राहिले; त्यांस दोन पुत्र होतें,

मग शके १७०६ सन १७८४ या वर्षी राघोबा दादास कोपरगावीं देवाज्ञा झाली. त्यांचे दोन पुत्रांपैकीं वडील बाजिराव, आणि धाकटे चिमाजी आपा, व तिसरे अमृतराव साहेब नामें दत्त पुत्र होते.

नानाफडणीस कारभार करीत होते; त्या वेळेस त्यांचे हाताखालीं हरिपंत फडके व परशुराम-भाऊ पटवर्धन मिरजकर हे दोघे फौजेचे मुख्य सरदार असून हरएक कामात मोठी मदत देत होते.

या पेशव्याचे कारकीर्दीत मोठ्या लढाया तीन झाल्या; त्यांत प्रथम मोरोबादादा फडणवीस याणें राघोबादादास पेशवाईची गादी मिळण्या साठीं मुंबईहून इंग्लिशांस बोलाविले. त्यांची व पेशव्यांची लढायी तीन वर्षे चालली होती; परतु शेवटीं इंग्लिशांचा पराभव होऊन माघारे आले; पुढें सल्ला झाला.

दुसरी लढायी शके १७१४ सन १७९२ इ० चे सुमारास महादजि शिंदे यांणीं उत्तर हिंदुस्थानांत फार मोठी करून दिल्ली कडे गुलाम कादर व हैदर बखत यांचा पराभव करून-त्यांस ठार मारलें, आणि दिल्लीचा पातशाहा शाहाअलम यास पुन्हा गादीवर बसविलें.

ही लढायी बरेच दिवस चालली होती आणि शिंदे यांस पेशव्या कडून होळकर व अलि

बाहेर मदत करण्या करतां फौज घेऊन ति कडे गेले होते.

या लढायीचा शेवट वर लिहिल्या प्रमाणें झाल्या वर शाहाअलम बादशाहा याणें माधवराव नारायण प्रधान यांस मुतालकीचीं वस्त्रें व नालकी व सन्मान व खलिता असेव दुसरे कितीएक सामान शिंदे याज बरोबर देऊन पाठविलें.

हें घेऊन शिंदे पुण्यास आल्या वर रामराजे महाराज यांची आज्ञा आणून मग मुतालकीचीं वस्त्रें व नालकी वगैरे दिल्लीहून आलेलीं मोठा दरबार करून तीं माधवराव नारायण यांणीं घेतलीं.

या माधवराव नारायणास दिल्लीहून बादशाहा कडून पत्र आलें; त्यांत किताब लिहिला होता; तो असा ;—

( या मध्यें मोठे अक्षरानें लिहिलेले शब्द फारशी भाषेचे आहेत, व त्यांज वरील बारिक अक्षरानें लिहिलेले शब्द त्यांचें मराठींत भाषांतर होय.

मानकरी परंतु वजिरासारखे. आणि संपत्ती.
अमारत. व अयाल
पदाधिकार सेना. आणि. ऐश्वर्य.
त. मर्त्तबात हषमत व षौकत
अधिकारी व स्थान सार मित्रता. चिन्हव
मंजिलत. जुबदय. विफके. षान.
डौल संपत्ति इछिक. अतिउत्तम. कल्या
दौलत. खाह. उमदय खै-
ण. विचारकरणारे. नाही. संशय. वाद-
र. अंदषानें. बिला. इष्तिबाह. कसी
विणार. विश्वास विश्वास चिन्ह.
रूल. इक्तिदार. अकिदत. दिसार.
दुधारीतलवार नग्न. रणभूमी. शौर्य.
सईफे मसलुले मेदान. षुजात
माला. शिकलकेलेला ह्मणजे सोज्वळ. रणकं
रुमदे. मसकुले. मिज-
दन. श्रेष्ठता. भरवसा आसमतातभा
मार. जलादत मदार. असनाफे.
लक्षणें. भिन्नता. नानाप्रकारचे रूपा.
अवताफ. मोहोबत. अन्वाये. अलताफ

पात्र. रूपा. छाया. वेष्टित. रूपा.
मवरदे. इनायत. जिल्ले. मषमूल. अवातिफे
उत्तम.

ज्ज मिल्

स्वतंत्र कामगार देश. अतिवरिष्ठ अधिकारी
वकिले. मुलक. अमिरुल.
मानकरी. सर्व मानकरी वजिरा सारखे. स्वतंत्रका
उमरा. मुख-
मगार सर्व देश. विश्वासचे सर्वकामें संपत्ति
तारुल मुमालिक. मदारुल. मोहम. सलतन
अतिउत्तम. सर्वकामगार स्तंभरूप. राज्य.
त. उमदय. आराकिने. खिलाफत
मित्र. स्नेहभाव सिध्दिस नेणारा. सेना. अधिप
योर. वफादार. सिदह. शिला.
ति. स्नदैववान् जिवलग. मित्र स्न
र सआदतमंद. बजान्ययवंद. फरजंदे
निश्चित केवळ सरकारचे. उपायसूचक
खासुल खास. मेलाजदेह. महारा

ज्याधिराज पंडित परधान सवाई माधवरा
महापराक्रमी. सेवक नांव आहे
यनारायण बहादुर. फिद्दिय. सहाअल
सिव्हासनाधिश योध्दा.
म पादषाहे गाजी.

# याचें मराठींत सरळ भाषांतर.

---

मानकरीपणा व संपत्तीचे अधिकारी से ना व संपत्तीचें स्थान, मित्रतेचे चिन्हानें चिन्हीतांतील केवळसार, राज्य अभिष्टचिंतक, निःसंशयपणें कल्याण इच्छकांतील अतिउत्तम, विश्वास वृध्दिकारक, भरंवशाचे चिन्ह आहे ज्यास, रणभूमींतील केवळ नग्न तलवार रणकंदनांतील महाशूरत्वाचे केवळ तीक्ष्ण धारेचा भालाच. महाश्रेष्ठ, परम विश्वासू स्नेहभावाचे सूलक्षणाचा आसमंतात भाग, नानाप्रकारचें कृपापात्र, सर्व कृपा उतरण्याचें स्थान. कृपचे छायेनें जे वेष्ठित अतिसर्वोत्तम.

देशासंबधीं स्वतंत्र काम चालविणार सर्व- अमिराचे अमिर ह्मणजे सर्व अधिकाऱ्यांचे प्रमुख अधिकारी सर्व देशाचा स्वसत्तात्मकपणें कारभार चालविणारे, दौलतीचे सर्वकामाचा भरवसा आहे ज्यावर, राज्याधारांचे केवळ स्तंभच अशा सर्व कारभारी मंडळीतील अति सर्वोत्तम, स्नेहभाव सिद्धिस नेणारा सूमित्र, सेनापति सुदैववान केवळ जिवलग, सरकारचे केवळ सुनिश्चित पुत्रच, उपाय सूचक असे जे महाराजाधिराज सवाई माधवराव पंडित प्रधान- महापराक्रमी हे शाहाअलम पातशाहा महा

योध्दा यांचे सेवक

असें अलकाबाचें पत्र व पोषाख वगैरे आले ते,—

पोषाख.

१ दस्तार शिरबस्ता  १ जामा.
१ निम अस्तनी.  १ चार कुब्ब.
१ चिरा.  १ बांकबंद.
१ कंबर बंद  १ दुमठा.
१ दुशाला.

नगवगैरे

१ समशेर  १ ढाल. (शीदर)
१ कलमदान.  १ शिकेदऊत.
२ मोर्च्छले  १ हत्ती.
१ घोडा.  १ नालकी.
१ पालखी झालदार

किता मरातब.

१ अलम मयहाती.  २ शागमय हती
२ दुमल मयहती.  १ माहिमयहती
१ मरातब मयहती.

## जवाहिरदागिने.

१ मोत्याची माळ पदक.
१ शिरपेंच
१ झगा.
१ कलगि परगिरी.

महादजि शिंदे यांस किताब " राजेमहाराज " महादजी शिंदे " मदारुलमोहम " ( सर्व कामांत श्रेष्ठ मरवशाचे ) या प्रमाणें-वस्त्रें व जवाहिर, हत्ती, घोडा, कांहीं मरातिब नालकी, पालखी या प्रमाणें त्यांस ही निराळे दिले.

या प्रमाणें दिल्लीहून आले, तेव्हां वर लिहिल्या प्रमाणें मोठा समारंभ करून पेशव्यांनीं घेतले, मग पेशव्याचे आज्ञेनें महादजी शिंदे यांणीं वस्त्रें व नालकी घेउन नालकींत बसून ते आपले डेऱ्यांत गेले. या प्रमाणें पुणें मुकामीं झालें

तिसरी लढायी शके १७१७ सन १७९५ इस-वी या वर्षी पेशवे याणी फौजेचा मोठा जमाव करून निजामअल्ली हैदराबादचा नबाब याशीं केली, ती खर्ड्याचे मुकामी होऊन त्या लढायींत निजामसरकारचा पराभव झाला, आणि पेशवे यांस मोठा जय प्राप्त होऊन निजामसरकारापासून खंडणीबद्दल त्यांचे राज्यांतील कांहीं मुलुख लावून घेतला, आणि-त्याचा कारभारी मशरील मुलुख यांस आणून पुण्यांत कैदेंत ठेविले. या लढायीची मोठी कीर्ति सर्व लोकांस खर्ड्याची स्वारी या नावानें मशहूर आहे.

खेरिज हैदरअल्ली यांचा पुत्र टीपूसुलतान यांशीं पेशव्याचा कलह चालू होता, परंतु शेवटं कांहीं झाला नाहीं.

या पेशव्याचे कारकीर्दींत राज्याचा बंदोबस्त नानाफडणीस याणीं आपले शाहाणपणानें चांगलीं अकलेचीं माणसें ( फडके वगैरे ) या सारखीं मदतीस हमेशा घेऊन फार चांगला ठेविला होता,

परराज्यांतील बातमी आपणास फारस त्वर समजावी, आणि आपली बातमी अगदीं फुटूनये, अशी तजवीज राखली होती, न्याय इन्साफ उत्तमरीतीनें होत असून जरब ठेविली होती; व मुलुख ही आबाद ठेऊन रयत बद फईल नव्हती; दरबारांत अमर्यादेचा स्पर्शन व्हता, मोठे शहाणपणें वागून फौजेचे व म सलतीचें बळ अगदीं कमी दिसून आलें नाहीं; इत्यादि कारणा वरून या कारकीर्दीचा फारच लौकिक झाला. या नानाफडणीसासा रखा कुशल व राज्य चालविण्या विषयीं स र्व हिंदुस्थानांत दुसरा कोणी पुरुष नव्हता; असें लोक ह्मणत होते.

सवाई माधवराव नारायण पेशवे शके १७१७ सन १७९५ या वर्षी अश्विनमासी दसरा झाल्या वर पुणें एथें शनवारचे वाड्या त तिसरे मजल्या वरून उडी टाकून, मांडी मोडून दोन दिवसानीं ह्मणजे अश्वीन शुध्द पौर्णिमा रोजी मृत्यु पावले

त्यांची कारकीर्द बेवीस वर्षे वागली. त्यासअ
वरसपुत्र नव्हता.

## कारकीर्दसातवी.

### चिमणाजीमाधव पेशवे

### यांची.

सवाई माधवराव पेशवे मरण पावल्यार मे शावाईचे अधिकारा वर चिमणाजी माधव असें नांव करून बाबुराव फडके व परशुराम भाऊ मिरजकर याणीं काम चालविलें. ती कारकीर्द थोडेच महिने वागली.

## कारकीर्दआठवी.

### बाजीरावरघुनाथ पेशवे यांची.

या पेशव्यास शके १७१८ सन १७९६ इसवी या वर्षी अधिकार प्राप्त होऊन वस्त्रें धाकटे शाहू महाराज आबासाहेब यांणीं दिलीं.

नंतर त्याणीं आपले कारभाराचें काम नाना फडणीस यास सांगून पुढें थोडकेच दिवसांत त्यांस दौलतराव शिंदे यांजकडून कैद करवून नगरचे किल्ल्यांत ठेविलें. नंतर आणखी बंदांतून सोडऊन कारभार सांगितला, पुढें लौकरच नानाफडणीस शके १७२२ सन १८०० इसवी या वर्षी मरण पावले, तेव्हां (त्या नानाबरोबर खरेपणा व शाहाणपणा गेला, असें सर्व लोक ह्मणूं लागले.)

या पेशव्यानीं आपणास गादीवर बसविण्याबद्दल शिंदे यांस दोन कोटी रुपये देऊं केले ते द्यावयास जवळ शिल्लक नवते, ह्मणून पुण्यांतील मोठे लोकांस मारहाण करून लूट केल्या सारखें फार द्रव्य नेलें.

नंतर शके १७२४ सन १८०२ या वर्षी एशवंतराव होळकर फौजेनिशीं पुण्यास येऊन पेशव्याचे फौजेचा पराभव केला, तेव्हां बाजिराव पळून प्रथम रायगडीं जाऊन मग तेथून वसईस जाऊन राहिले.

तेव्हां. होळकर याणी पुणें शहर लुटून लो कांचे हाल करून पुष्कळ द्रव्य हरण केले.

मग अमृतराव साहेब शके १७२४ सन १८०२ याच वर्षी जुनराहून येऊन पुण्या नजीक भाबुडर्यास राहून राज्यकारभार चालविला; त्यांचे चिरंजीव विनायकराव यांससातान्याहून आबासाहेब धाकटे शाहूमहाराज यांजकडून चतुरसिंग राजे याणी वस्त्रें देवविली. नंतर बाजिराव वसईहून माघारे येण्यापुर्वी अंमृतराव साहेब चिरंजिवा सुध्दां इंग्लिशांचे बाहेदारीनें काशी कडे चित्रकोटस–जाऊन राहिले; त्यांस सालिना आठलक्ष रुपये खर्चास पावत होते; त्याणी जातांना वाटेनें नाशीक वगैरे पुष्कळ गाव लुटले.

मग बाजिराव याणीं वसई मुकामीं इंग्रजाशीं तह करून अनुकूळता करून घेऊन पुण्यास येऊन अधिकार चालवूं लागले.

नंतर इंग्लिशाशीं तह ठरविल्या प्रमाणेंचालावें, असें बाजिराव यांचे मनांत हो नेंच; पुढें गायकवाड यांचा वकील गंगाधर

शास्त्री पटवर्धन हा इंग्लिशसरकारचे बाहेदारीनें राहिली खंडणी देण्याचें बोलण्यास आला होता, त्यास पंढरीमुकामी त्रिंबकजी डेंगळे-यास सांगून मारेकरी यांचे हातून शके १७३७ सन १८१५ या वर्षी ठार मारलें.

पुढें डेंगळ्यास इंग्रजाचे हवाली केलें, त्यांणीं त्यांस किल्ल्या वर नेऊन ठेविलें, तेथून तो पळाला, परंतु पुन्हा धरून मरे पर्यंत कैदेंत ठेविला होता.

पुढें बाजिराव यांणीं चोरून फौज ठेऊन इंग्लिशांचा नाश करण्याचें मनांत आणून शके १७३९ सन १८१८ इसवी या वर्षी कार्तिकमासीं इंग्लिशाशीं लढायी चालू केली, तेव्हां पेशव्यांचे मुख्य सरदार बापूगोखले होते, ही लढायी बारा दिवस चालून तेरावे दिवशीं बाजिराव यांचे फौजेचा पराभव होऊन पळणीस आरंभ झाला.

मग पळतां पळतां आष्टेमुकामीं एक लढायी होऊन त्यांत बापूगोखले मारले गेले त्या वेळेस तेथें पेशव्या चे लश्करांत सातारचे म

हाराज होते; ते इंग्लिशास मिळाले.

नंतर बाजिराव पळून गेले; ते शके १७४० सन १८१८ या वर्षी इंग्लिशाचे सरदार मालकम साहेब यांस भेटले; त्याणीं तह करून पेशवे यांजला ब्रह्मवर्त एथें भागिरथीचे काठीं ठेऊन त्यांजला प्रतिवर्षी आठलक्ष रुपये पेनशान केलें; ते बाजिराव अलिकडे सुमारें पांचसात वर्षा पलिकडे कैलासवासी झाले; त्यांचे वंशास इंग्लिश सरकारांतून नेमणूक वगैरे कांहीं पावत नाहीं.

बाजिराव यांचा दत्तपुत्र धोंडोपंत नाना याणें बाजिराव यांचे पश्चात सन १८५७।५८ शके १७७९ या वर्षी उत्तर हिंदुस्थानांत मोठें बंड केलें होतें; परंतु तें इंग्लिश सरकारानें मोडून धोंडोपंत नाना यांचा अगदीं पराभव केला.

---

समाप्त.

# सातारकर महाराज यांचे फरनीस (पंतसचीव, अष्ट प्रधानांतील दुसरे) यांचा इतिहास.

## भाग तेरावा.

श्रीमंत शिवाजी महाराज छत्रपति यांणीं शके १५९६ सन १६७४ इसवींत राज्याभिषेक करून घेऊन शक चालविला, तेव्हां अष्ट प्रधान केले; त्यांत आनाजी दत्तो फरनवीस (सचीव) पदाचा अधिकार दिला, हे आनाजी दत्तो शिवाजी महाराजाचे लश्करांत, मोठे योग्यतेस आलेले व सर्व कामेंकाजें केलेले, आणि उपयोगी पडलेले असे होते.

पुढें शके १६०२ सन १६८० इसवीस शिवाजी महाराज मरण पावले, तेव्हां त्याचे वडिल पुत्र संभाजी महाराज यांस प्रति

बंधात ठेऊन धाकटे चिरंजीव राजाराम म हाराज यांस राज्याचे गादी वर स्थापण्याचे मसलतींत मुख्य हे होते.

पुढें संभाजीमहाराज प्रतापगडा व र येऊन राज्यकारभार आपण करूं लाग ले; तेव्हां आनाजिदत्तो सचीव हे राजारा म महाराज यांचे पक्षाचे ह्मणून त्यांजला- शके १६०२ सन १६८० इसवी या वर्षी कै द केलें.

पुढें आनाजीदत्तो सचीव याणें रा जाराम महाराजां कडुन मोंगलां कडे कांहीं राज्य कारण केलें; असा आरोप ठेवून त्यां स प्रतापगडा वर ठार मारलें.

पुढें संभाजीमहाराज यांचे कारकी र्दीत रामचंद्र निळकंठ ह्मणून कोणी मु रनवीस (सचीवपदाचा) कारभार चाल वीत असे;

परंतु पुढें तो (रामचंद्र निळकंठ) त्याच कारकीर्दीत संभाजी महाराज यांचे वाईट वर्तणुकी मुळें आपलें पद सोडू न गेला.

पुढें राजाराम महाराज कर्नाटक प्रांती जिंजीकडे गेले; तेव्हां त्याणीं तेथें अष्टप्रधान केले; त्यांत शके १६१२ सन १६९० या वर्षी शंकराजी मल्हार यांस सचीवपदाचा अधिकार दिला; पुढें जिंजीस मोंगलाचा वेढा पडला तेव्हां शंकराजी मल्हार आपला अधिकार टाकून काशीस निघून गेले.

( पुढें जे सचीव झाले; त्यांचे वंश हल्लीं अधिकारावर आहेत; त्यांचे घराण्यांचा इतिहास खाली लिहिण्यांत येत आहे )

---

पुण्याचे नैऋत्य दिशेस आठ कोसांवर मांगदरी ह्मणून गांव आहे; तेथील राहणार मुकुंदमल्हाद यांचे चिरंजीव नारोमुकुंद हे कारकुनीचा धंदा करून होते.

नारोमुकुंद हे श्रीमंत शिवाजीमहाराज यांचे लश्करांत सुमारें शके १५६५ सन सोळाशें त्रेचाळीस इसवींत चाकरी धरून लहानसे कारकुनीवर राहिले.

त्या नंतर शके १५७० सन १६४८ या वर्षी शिवाजीनीं मोरप किल्ला घेतला; तेव्हां-

त्यांज बरोबर नारो मुकुंद हे असून त्यांणीं पुष्कळ उपयोग केला; त्या वेळेस त्या भोरपकिल्यावर सबनिशीचा दरक असामी* शिवाजीराजानीं त्यास दिली.

शके १५९९ सन १६७७ इसवीचेस्कमारें भोरप किल्याचा हिशेब घेऊन शिवाजी महाराज यांचे लश्करांत प्रतापगड मुकामीं नारो मुकुंद गेले; त्यांज बरोबर त्यांचे चिरंजीव शंकराजी नारायण होते.

शंकराजी नारायण यांजला तेच वेळेस मोरो त्रिंबक पेशावे (मुख्यप्रधान) यांणीं आपले जवळ ठेऊन कामकाज सांगूं लागले तेव्हा पासून ते फौजेचे आणि मसलतीचे-कामांत प्रवीण झाले

पुढें त्याच संधीस मांगदरी मुकामीं-

---

* सबनिशीचा दरक ह्मणजे किल्या संबधी सर्व हिशेब ठेविणें; व त्यांजवर धान्यादि सामुग्री व दारुगोळा इत्यादि युध्द सामान ठेवण्याची देखरेख ठेविणें असें या दरकाचें काम आहे.

शामभट महाशब्दे यांची कन्या एसूबाई यां
ज बराबर शंकराजी नारायण यांचा शरिर सं
बंध झाला.

शके १६०८ सन १६८६ चे समारासशं
कराजी नारायण यांणीं रामचंद्र आबाजी ब
हुतकर "हुकुमत पन्हा" यांचे लश्करांत मोठे
हुद्याचीं व जोखिमेचीं कामें केलीं; आणि प्रसि
द्धीस आले, त्यांत मुख्यत्वें करून धनगरलो
क व मावळेलोक यांज वर त्याची प्रीतिहोती.
आणि त्या लोकां बरोबर नेहेमी शिकारीस
जावे; मावळी मुलुख व चोरवाटा पाहाव्या, अ
सें करीत असत.

शके १६१० सन १६८८ या वर्षी शिवाजी
महाराज यांचे जेष्ठ चिरंजीव संभाजीमहा
राज यांस मोंगलानीं धरून नेलें; आणि ति
कडे त्यांचा वाईट परिणाम झाला; तेव्हां-
शिवाजीचे कनिष्ठ पुत्र राजाराम महाराज-
रायगडा वर होते; ते राज्यकारभार चालवूं-
लागले. परंतु संभाजीचे कारकीर्दीत फार अ
व्यवस्था होऊन शिवाजीचे वेळचे मानकरी

व सरदार चोहोंकडे गेले, या मुळें आणि मों गलाची फौज सर्व इकडे पसरली, व त्यांणी सं भाजीची स्त्री व पुत्र (शिवाजी) "याचेंच नांव पुढें शाहू पडलें" यांस धरून नेऊन मिरज व पन्हाळा किल्ला घेतला. तेव्हां इकडे राजा-राम याच्यानें धीर धरवेना; (राजाराम जर ते व्हां इकडे राहता तर त्याला मोंगलांनीं धरलें असतें.)

असे प्रसंगीं आपले सर्व सरदार जमा करून त्यांचे विचारें राजाराममहाराज चंदीचं जाउराकडे जींजीस जाण्या करतां प्रल्हादनि राजी वगैरे एकवीस माणसें विश्वासूक बरोब र घेऊन तिकडे गेले.

राजाराममहाराज चंदीकडे गेले, तेव्हां त्याणीं इकडे विशाळगड व रांगणा वगैरे कि ल्ले व मुलखाचा व शिबंदीचा बंदोबस्त कर ण्यास रामचंद्रआबाजी बहुतकर हुकुमतपन्हा यांस व आणखी विश्वासू कांहीं लोकांस सां गितलें.

रामचंद्रआबाजी यांणी शिवाजीमहारा

ज यांचे वेळचे मानकरी व मराठे सरदार वगैरे जमवून मोंगलांचे लश्कराच्या टोळ्या माराव्या, रसदा लुटाव्या, किल्ले घ्यावे; असा क्रम चालविला.

जे जे लोक इकडे पराक्रम करीत; तेंसर्व वर्तमान चंदीकडे कळून महाराजा कडून-त्यांस बक्षिसें, पदाधिकार, व किताब येत, अशी चाल पडली; या मुळें पुष्कळ शिपायीशूर प्राणा परते श्रम करीत.

त्या रामचंद्र पंताचे लश्करांत शंकराजी नारायण यांणीं सह्याद्रि घांधोरी मावळ मुलुखांत राहून धनगर, मावळे, कंक, मालुसरे वगैरे लोक व त्यांचे सरदार "शिवाजीचे वेळचे" जमवून मोंगलाच्या फौजा माराव्या, रसदा लुटाव्या, छापे घालावे, आणि किल्ले व मुलुख घ्यावे, असें करूंलागले.

शके १६१४ सन १६९२ इसवी यावर्षीं शंकराजी नारायण यांणीं एके दिवशीं रात्रीं राजगड किल्ल्या पाशीं आपले मावळे लोकांसह येऊन किल्ल्यास घोरपड लावून माळ लाविली,

आणि आपण पुढें होऊन मावळे लोकां सह किल्ल्या वर चढून मोंगली फौजे वर छापा घालून किल्ला घेतला.

त्या वेळेस खर्चा साठीं रामचंद्र आबाजी बहुतकर यांणें वाई परगण्याचा सुभा शंकराजी नारायण यांस देऊन व त्याचे पराक्रमाचें वर्तमान चंदी कडे महाराजास कळून तिकडून शंकराजी नारायण यांस "मदारुल् मोहम" म्हणजे सर्व कामांत श्रेष्ठ भरवशाचे असा किताब व वस्त्रें आलीं.

पुढें दिवसें दिवस शंकराजी नारायण यांणें पुष्कळ फौज जमा केली; त्याचें राहणें बहुत करून सह्याद्रि घाटमाथ्या वर असून रात्रीं स्वाऱ्या करून छापे घालावे, किल्ले घ्यावे असें ते करीत होते; त्यांणीं शके १६१५ सन १६९३ चे सुमारास व त्याचे पुढें तोरणा व रोहिडा व दुसरे पुष्कळ किल्ले व मुलुख मोंगलां पासून घेतले आणि पुढें मोठे विख्यात झाले, व त्यांणीं मोंगलाचे फौजेचा फार मारा केला.

राजाराममहाराज कर्नाटकांत गेल्याचे- पाठी मागें रामचंद्र आबाजी बहुकर, शंकराजी नारायण, धनाजी जाधव, संताजी घोरपडे, पर- शुराम त्रिंबक यांणीं या प्रांतीं पुष्कळ फौज ज मा करून आणि पराक्रमानें व मसलतीनें मो गली फौज मारून लुटून त्यांज पासून बहुते- क किल्ले व मुलुख सोडविले; हें वर्तमान नेहे मी महाराजांस कळवित असत.

तिकडे जिंजीचे मुकामी राजाराम महारा ज पोंचल्यावर त्यांणीं आपले वडिलाचे जाहगि रीत अष्टप्रधान जमवून राज्य करूं लागले;- तिकडे औरंगजेबाचा सर दार जुलफिकार खान याणें चंदीस वेढा घालून राजाराममहा राज यांस चंदीतून काढून दिलें; तेव्हां तेथू न गुप्तपणें निघून विशाळगड प्रांतीं आले.

विशाळगड प्रांतांत रामराजे महाराज ज यांस मराठी फौज अनुकुळ झाली. आणी मग रामचंद्र आबाजी बहुतकर यांचे व शं कराजी नारायण पंतसचीव यांचे मसलती नें महाराज सातान्यास आले.

त्या वेळस ह्मणजे शके १६१९ सन १६९७ इसवी या वर्षी शंकराजी नारायण यास महाराजांनी ( यांणीं फार पराक्रम केला; व मोंगला पासून किल्ले व मुलुख सोडविले ह्मणून ) अष्टमधांनातील सचीवपदाचा अधिकार दिला.

शके १६१९ सन १६९७ या वर्षी पदाचा अधिकार देऊन खालीं लिहिले प्रांत व किल्ले शंकराजी नारायण यांज कडे दिले.

प्रांत.

| | |
|---|---|
| १ प्रांत जुन्नर. | १ चौल प्रांत. |
| १ पुणें. | १ राजपुरी. |
| १ कडेवळीत. | १ कर्ई. |
| १ इंदापूर. | १ पौड खोरें. |

किल्लेवत्यासबंधीं
मुलुख.

१ सुधागड ( भोरपकिल्ला ) १ तोरणा ( प्रचंडगड )

| | | | |
|---|---|---|---|
| १ | पुरंदर | १ | मृगगड. |
| १ | वर्धनगड | १ | कावेरीगड. |
| १ | मनमोहनगड | १ | रोहिडा ऊर्फ वि |
| १ | राजगड | | चित्र गड. |
| १ | सिव्हगड कोंडणा. | १ | घनगड. |

---

एणें प्रमाणें प्रांत व किल्ले दिले, आणि सर्व दक्षिण व कर्नाटक व कोकण एथें महाराज यांचें स्वराज्य व मोंगलाई मुलकात सहोत्रे बाबेचा अम्मल वतनी करून दिला, या सहोत्र्याचे सर्व मिळून महाल अदमासें पाचशेंपन्नास तालुके आहेत, व या सहोत्र्याची जमा अदमासें दीड लक्ष कमाल होती.

या शिवाय कांहीं फूट इनाम व इसाफत गांव व रोहिडखोरें याचें देशपांडे पण असें दिलें.

या सर्वांची वहिवाट आपले कामगार ठेऊन शंकराजी नारायण याणी चालविली, व आपण बहुत करून सिव्हगड, राजगड, रोहिडा या वर राहात असत.

या प्रमाणें होऊन पुढें शके १६२१ सन १६९९ इसवी या वर्षी फाल्गून वद्य न वमीस सिंहगडा वर राजाराम महाराज मृत्यु पावले; त्याचे पुत्र शिवाजी महाराज हे अधिकारी करून ते लहान (दहावर्षांचे) ह्मणून राजाराम यांची स्त्री ताराबाई यांणीं राज्य कारभार करावा; असें ठरलें; तेव्हां ही मसलत करणारे व राज्यकारभार चालविणारे झाले ते:-

१ रामचंद्र आबाजी बहुतकर "हुकुमत पन्हा."

१ शंकराजी नारायण.

१ धनाजि जाधव सेनापति.

---

या तिघांचे विचारें सर्व राज्यकारभार ताराबाई करीत असत; या तिघानीं फौजेचा व मुलकाचा बंदोबस्त उत्तम प्रकारचा ठेविला होता.

शंकराजी नारायण याजला पदाधिकार प्राप्त झाला; तेव्हां त्याचे नांवचा शिक्का चालू लागला; त्यांत त्याचे नांवचीं अक्षरें कोर

ले ली आहेत, तोच शिक्का आज पर्यंत त्यांचे वंशज चालवित आहेत.

महाराजांचे पदरीं सचीवाचें मुख्य कामम्ह टलें म्हणजे दप्तर संभाळणें, व सनदांची बारनिशी ठेवणें, असें आहे. आणि महाराज सरकारातून कोणास सनद पत्र करून दिले तर त्याजवर "रुजुस्कर नवीस" "स्करु मुद बार" अशीं अक्षरें सचिवाची असत. व महाराजानीं यांसपत्र लिहिणें; तर वर राजश्री शंकराजी पंडीत" असें नांव लिहून शेवटीं "बहुत काय लिहिणें सूज्ञ असा" असें लिहिण्याची चालहोती

महाराज सरकारातून सचिवपदाचीं वस्त्रे झालीं, व पुढें दरएक पुरुषाचे वेळेस वस्त्रें झालीं तरीं महाराजांकडून वस्त्रें व जवाहिर वगैरे खालीं लिहिल्या प्रमाणें देण्याची चाल होती.

## वस्त्रें.

१ प्रथम भेटी समयीं चादर छडीदार

१ पदाची वस्त्रें; मंदील एक; चादर छडीदार एक; किनखाप एक; पटका एक

| | | | |
|---|---|---|---|
| १ | शिकेकट्यार. | | |
| १ | शस्त्रें; ढाल, एक | | तलवार एक. |
| १ | चौघडा. | १ | हत्ती नग एक. |
| १ | घोडा एक | १ | जवाहिर, चौकडा-मोत्याचा एक. |
| १ | चवरी रुप्याचे दांडीची. | | कंठी मोत्यांची एक |
| १ | कलमदान ताडीचें. | | तुरा मोत्यांचा एक. शिरपेंच. |

या प्रमाणें देण्याची चाल होती; आणि सचिवानीं भेटीचे वेळेस महाराजांस कांहीं मोहरा नजर कराव्या लागत; ( बहुधां पंधरा मोहरा नजर द्याव्या लागत. )

शके १६२९ सन १७०७ या वर्षी मोंगलांचे कैदेंतून सूटून संभाजीचे पुत्र शिवाजी ( शाहू ) इकडे आलेतेप्रथम गंगातीरीं आले; हें वर्तमान ताराबाईस समजलें; त्यांणीं अष्टप्रधान व सरदार जमा करून एक पंगती भोजनाचा बेत केला; व दुधभाता वर हात ठेऊन सर्वांपासून क्रिया घेतली कीं, सर्वांनीं ताराबाई व तिचापुत्रयांचा पक्ष स्वीकारावा

आणि शाहू महाराज आलेले; तोतया ह्म-
णून त्यांजला कोणी मिळूं नये.

ही शपथ केल्या वर पुढें कित्येकांनीं-
शाहूमहाराजा विषयीं चौकशी केली; तों हे शा
हू महाराज संभाजी महाराज यांचे पुत्र खरे,
अशी खात्री झाली.

त्या वेळेस ताराबाई यांचे हुकुमानें से-
नापति व प्रतिनिधी हे गंगातीरीं शाहुराजाचे
पराभवा निमित्य गेले; त्या पैकीं सेनापति शा
हूमहाराजांस मिळाले, आणि प्रतिनिधी परा-
भव पावले; मग शाहूमहाराज निघून पुण्या
स आले; तेथून जेजुरीस गेले.

जेजुरीहून शाहूराजे यांणीं शंकराजी ना
रायण यांस भेटीस येण्या विषयीं पत्र पा
ठविलें; तें पत्र पावल्या वर शंकराजी नारा-
यण यांणीं विचार केला कीं, ताराबाई साहेब
यांज पाशीं शपथ वाहिली आहे; जावे, हें बरो
बर नाहीं; आणि नजातां युध्द करावें; तर शा
हूमहाराज धनी, त्यांज बरोबर युध्द करणें,
हें फार अनुचित कर्म होते; या साठीं कांहीं वि-

चार करावा; ह्मणून रायगडास जाऊन राहि-
ले; आणि पत्राचें उत्तर कांहीं पाठविलें नाहीं

नंतर प्रतिनिधी शिवाय बहुत करून स
र्व सरदार व मुत्सदी शाहूराजास मिळाले; व
त्यांणीं कितीएक किल्ले घेऊन सातारा किल्ला
घेतला.

पुढें शाहूराजानीं पुन्हां पत्र व कांहीं फो
ज शंकराजी नारायण यांस आणण्यास पा-
ठविली; हें वर्तमान शंकराजी नारायण यां
स कळलें; तेव्हां ते चांगले बंदोबस्ताचे कि
ल्यावर होते; व त्यांज कडे फौज व युध्द सा
मुग्री असतां ही त्याणें इमानानें नीती साठीं
आणि सत्या करतां राजगड किल्ल्या वरून-
निघून भोरा पासून चार कोसां वर आंबवडे-
मुकामीं अतुर सन्यास घेऊन शके १६२९
सन १७०७ या रोजीं कांहीं वीष खाऊन देह
ठेविला.

शंकराजी नारायण यांस वय समारेंपं
चेचाळीस अगर शेचाळीस वर्षांचें असावें व
यांजला दोन औरस पुत्र व दत्तक पुत्र एक अ

से होते; त्या पैकीं जनार्दन शंकर लहानपणीं-च मरण पावले, ह्मणून महादजी शंकर स्वगोत्री दत्तक घेतले होते, त्या जवर पुढें नारोशंकर-औरस पुत्र झाले, ते नारो शंकर शंकराजी नारायण मरण पावले, तेव्हां दोन वर्षांचे वयाचे होते.

या प्रमाणें शंकराजी नारायण मरण पावल्याचें वर्तमान शाहूराजे यांणीं चंदनचे मुकामीं ऐकिलें, तेव्हां त्यांची नीति व गुण ऐकून सखेदाश्चर्य वाटलें, आणि त्यांची राजभक्ति व सत्यदक्षता आणि पराक्रम यांज कडे शाहूराजानें लक्ष्य पुरविलें, तेव्हां नारोशंकर दोन वर्षांचे वयाचे असतां त्याजला सचिवपदाचा अधिकार देऊन वस्त्रें पाठविलीं. ही गोष्ट शके १६२९ सन १७०७ माघ महिन्यांत घडली.

या नारोशंकराचे राहणें बहुतकरून रोहिडे किल्ल्या वर व त्या नजीक वरोडी व नेरें या गावीं असे.

शके १६४२ सन १७२० च्या सुमारास द माजी थोरात (ज्याणें बाळाजि विश्वनाथ यांस व त्यांचे दोन चिरंजीव व मुतालिक या सह कैदेंत ठे विलें होते, ते शाहूराजाने दंड भरून सोडविले) त्याचा पराभव करण्या विषयीं शाहूमहाराजानीं आज्ञा पाठविली. त्याज वरून दमाजि थोरात व नारोशंकर यांचे युध्द होऊन थोरात याणें ना रोशंकर सचीव यांस व त्यांचे मुतालिक यांस हिं गण गांवचे किल्ल्यांत धरून कैदेंत ठेविलें.

मग त्या दमाजी थोराताचा पराजय क रण्या करतां शाहूमहाराजानीं पुन्हां बाळाजि-विश्वनाथ यांज बरोबर मोठी फौज देऊन पा ठविलें, त्यांज कडे नारोशंकर सचीव यांची मा तुश्री एसूबाई यांणीं राज्यकारण केलें, त्याजव रून बाळाजि विश्वनाथ यांणीं मसलत केली कीं जर या वेळेस याशीं युध्द केलें तर थोरात नारो शंकराचा घात करील या साठीं युक्तीनें व मसल तीनें तहा सारखें बोलणें लावून अगोदर सचीवाची व त्यां चे मुतालिकाची सुटका करून घेतली. व मग बा-

ळाजि विश्वनाथ यांणीं त्या थोरातांचा लढा
यी करून पराभव केला.

या उपकारा बद्दल नारोशंकर व त्यांची
मातुश्री एसूबाई यांणी बाळाजि विश्वनाथ या
स पुणें परगणा व पुरंदर किल्ला व त्या संबधीं
मुलुख दिला, व तें बाळाजि विश्वनाथ याणें
शाहु राजा कडून आपणा कडे करून घेतलें

नारोशंकर सचीव शके १६५९ जेष्ठ, सन
१७३७ मार्च महिन्यांत मरण पावले, तेव्हां
शंकराजी नारायण यांचे दत्त पुत्र महादजी
शंकर यांचें पुत्र चिमणाजी महादेव हे बहु
त करून महाराजा जवळ असत, त्याजला
च चिमणाजी नारायण असें नाव ठेवून शके
१६५९ सन १७३७ या वर्षी महाराज याणीं
सचिव पदाचा अधिकार व वस्त्रें दिलीं

या चिमणाजी नारायणाचें लग्न शा
मजी हरि शिरवळकर यांचे कन्ये बरोबर-
झाले, त्याजला तीन औरस पुत्र झाले,

चिमणाजी नारायण यांणीं शके १६६२
सन १७४० या वर्षी देशपांडे कुळकर्णी तालु

के घेलखंड खोरे यांचे निमे वतन चवदाशेंपन्ना स रुपये देऊन आपल्यास वंशपरंपरेनें राघो अनंत यांज पासून खरेदी घेतलें.

हे चिमणाजी नारायण यांणीं आपलें र हाण्याचें गांव भोर पुण्या पासून दक्षिणेस बारा कोस ( जेथें परमेश्वर कृपेनें अद्यापि त्यां चा वंश स्रखानें आणि नीतीनें राज्य करीत-आहे ) तें ठिकाण केलें.

भोरास राहण्याचें कारण असें असावे, कीं पूर्वी वरोडी एथें राहात असत; तेथील वाडा याच संधीस जळाला, तेव्हां भोर गांव निरानदी चे काठीं चांगला पाहून तेथें आपली मुख्य रा ज्य धानी केली.

शाहूमहाराज यांचे पश्चात राजाराम म हाराज यांचा नातु रामराजे यांची कारकीर्द झा ली; तेव्हां ताराबाई साहेब व रामराजे यांस कां हीं नेमणुकी दाखल खर्चास ठरवून राजमंडळ नोडिलें; आणि सर्व कारभार पंतप्रधान करूं लागले; त्यांणीं ताराबाई साहेब यांची आज्ञा झाल्याचें निमित्य करून सिव्हगड व त्या संबं-

धीं मुलुख मागूं लागले; परंतु चिमणाजी नारा यण व त्यांचे पुत्र सदाशिव चिमणाजी हे पुष्ट करूं लागले; ह्मणून त्यांजला तुंग व तिकोना हे दोन किल्ले व आणखीं त्या संबंधीं मुलुख पेशवे यांणीं देऊन सिंव्हगड किल्ला घेतला.

ही गोष्ट शके १६७४ सन १७५२ इसवीस झाली.

पुढें शके १६७९ सन १७५७ इसवी या वर्षीं चिमणाजी नारायण हे मृत्यु पावले; त्यांचें थडगें भोर एथें मुरलीधराचे देवालया नजीक वाडया पुढें चौकांत आहे.

चिमणाजी नारायण यांस पुत्र तीन होते; पहिले सदाशिवराव; दुसरे आनंदराव; आणि तिसरे रघुनाथराव असे होते.

या त्रिवर्ग बंधू पैकीं सदाशिवराव चिमणाजी आणि आनंदराव चिमणाजी यांजला पुत्र नाहीं. रघुनाथराव यांचा शरिर संबंध रामचंद्र शामराज शिरवळकर यांचे कन्ये बरोबर झाला होता; त्यांस एक पुत्र, त्याचें नांव शंकरराव व

या त्रिवर्ग बंधू पैकी सदाशिवराव चिमणा जी यांस ताराबाई साहेब यांणीं रामराजे यांचे का रकीर्दीत शके १६८० सन १७५८ या वर्षी पदा- चीं वस्त्रें दिलीं. हे बहुत करून पुण्यास व कांहीं दिवस सातान्यांत होते.

आनंदराव चिमणाजी कांहीं दिवस तुंग व तिकोना या किल्ल्या वर होते, ते शके १६९८ सन १७७६ इसवी या वर्षी कैलासवासी झाले.

नंतर सदाशिवराव चिमणाजी सचीव शके १७०९ सन १७८७ ज्येष्ठ वद्य पंचमीस मरण पावल्या वर सचिवपदांचीं वस्त्रें धाकटे शाहू म- हाराज यांणीं श्रावण शुध्द द्वादशी शके सत्रा शे नऊ सन १७८७ या वर्षी रघुनाथराव यांस दि ल्हीं.

यांचे कारकीर्दीत विशेष लिहिण्या- सारख्या गोष्ठी झाल्या नाहींत, मात्र यांचे का रभान्यांत त्या वेळेस वैमनस्यें फार होतीं, पर तु कांहीं ग्रंथांत घेण्या सारखी गोष्ठ घडली ना- हीं. यांचे कारकीर्दीत पिलखान्याचे खर्चा-

बद्दल कांहीं अम्मल महाराज सरकारांत गेलाअ साचा.

पुढें रघुनाथराव शके १७१३ आषाढ शुध्द-दशमी सन १७९१ या वर्षी कैलासवासी झाले; त्यांचे औरस पुत्र शंकरराव यांस धाकटे शाहू महाराज यांणीं शके १७१३ सन १७९१ इस वी श्रावणमासीं सचिवपदाचा अधिकार व वस्त्रें दिलीं.

शंकरराव रघुनाथ सचीव यांचा शरिरस बंध सखाराम भगवंत बोकील ( पेशव्यांचे-कारभारी ) यांचे मुली बरोबर झाला.

हें लग्न मोठ्या समारंभानें वाई एथें झालें; दुसरें लग्न रामशास्त्री यांचें कन्येबरोबर; आणि तिसरें लग्न विश्वासराव आंबेकर यांचे कन्ये बरोबर झालें. अशा तीन स्त्रिया-होत्या त्यापैकीं पहिल्या दोघी कैलासवासी झाल्या; आणि आंबेकर यांची कन्या राधाबाई-ही हल्लीं आहेत. या तिघींतून कोणास पुत्र-झाला नाहीं.

शंकरराव हे आपले कारकीर्दीत कांहीं-

बरेच दिवस जेजुरीस होते, तेथें त्यांचे कारभारी-बाजिराव मोरेश्वर होते, त्यांणीं शके १७१९ सन १७९७ इसवीचे सुमारें बाळाजिजनार्दन (नाना-फडणीस) यांस कांहीं गैरवाका मजकूर समजावून गर्दी केली, आणि धरलें. हें वर्तमान सचिवांचे पक्षपाति महादजिशिंदे यांस पुणें मुकामीं कळविलें त्या वरून शिंदे यांणीं सचिवास पुण्यास नेऊन त्यांचा चांगले प्रकारें मान राखिला.

शंकररावसाहेब शके १७२० सन १७९८ इसवी या वर्षी चैत्रवद्य द्वादशीचे दिवशीं मरण पावले. त्यांस औरस पुत्र नाहीं, म्हणून मूळपुरुष शंकराजीनारायण यांचे चुलते विठ्ठल मुकुंद यांचे वंशा पैकीं काशीमोरेश्वर यांचे चिरंजीव दत्तक घेतले व त्यांचें नांव चिमणाजी शंकर असें ठेविलें यांजला शके १७२० सन १७९८ इसवी या वर्षी पंतप्रधान यांणीं पुष्कळ नजर घेऊन धाकटे शाहुमहाराज यांज कडून चिमणाजी शंकर यांस सचीवपदाचा अधिकार व वस्त्रें देवविलीं

या चिमणाजी शंकरास दोन स्त्रिया होत्या. पहिली, भवानीबाई, आपाजीपंत राजउपा

ध्ये यांची कन्या आणि दुसरी लक्ष्मीबाई नर सो लिंबाजी महादेवकर यांची कन्या.

यांत पहिलीस बाईसाहेब आणि दुसरीस काकीसाहेब असें ह्मणत असत.

यांजला राज्याधिकार प्राप्त झाल्या वरपुढें कित्येक दिवसांनीं यांची मातुश्री राधाबाई यांचें आणि या सरकारचें वैमनस्य वाढत वाढत पुढें फारच वाढलें, त्याचा शेवट परिणाम इतका जहाला कीं राधाबाई साहेब यांणीं आपाजिराव निंबाळकर वाठारकर यांज कडे फितुर चालविला.

ते आपाजिराव निंबाळकर वाठारकर शिंदे यांचे पदरीं मोठे वाढलेले व फौजबंद होते, त्यांचे कर्ज चिमणाजी शंकर दत्त घेतले, त्या वेळेस पेशवे यांस नजर देण्या साठीं पुष्कळ घेतलें होतें, त्या कर्जाचे निमित्त्यानें कर्ज वसूल करण्या साठीं ह्मणून त्या आपाजिराव निंबाळकर वाठारकर यानें पुष्कळ आरबलोक मोरचें पाठविले.

त्या आरब लोकांनीं निंबाळकर यांजक

डे राधाबाई यांचा फितुर होता, त्या मसल
ती वरून चिमणाजी शंकर यांस माघ शुद्ध ष
ष्टी शके १७३५ सन १८१३ या दिवशीं मोरा
स केद करून मोठे बंदोबस्तांत ठेविलें.

त्या वेळेस इंग्लिश सरकारांतून पेशवे स
रकारांत खरसदजी शेट मोधी वकिलीस होता,
आणि तो आपाजि निंबाळकराचा मित्र व त्या
ज कडे राधाबाई यांचे राज्यकारण होतें, ह्मणू
न बाजिराव रघुनाथ प्रधान यांस चिमणाजी
शंकर यांचे चाली विषयीं नानाप्रकारचे गैरवा-
का मजकूर समजवावे, आणि निंबाळकर वा
ठारकर यांनीच कारभार करावा. असें तिकडे
चालविलें.

इकडे चिमणाजी शंकर यांजला व त्यां
चे प्रतिपक्षी मोला आणि रयतेस निंबाळक
र यांचे आरबांनीं व बाई कडील मंडळी
नें जो त्रास केला आणि जुलूम केला, तें लि
हिलें आणि सविस्तर केलें तर ग्रंथ फार मो
ठा वाटेल

चिमणाजी शंकर यांचे तर्फे मंडळीनीं-

पुण्यास प्रधान यांज कडे पुष्कळ उद्योग केला रंगो मोरेश्वर वकील व जनार्दन नारायण शिवापूरकर वगैरे पुष्कळ लोकांनीं यत्न केला, तो मोधी जिवंत होता, तों पर्यंत चालला नाहीं; तरीं लौकरच कांहीं राज्यकीय प्रसंगात् त्या मोधीनें वीष खाऊन प्राण दिला; तेव्हां बाजिराव रघुनाथ प्रधान यांजला अनुकूळ करून घेऊन निंबाळक रांचे कैदेंतून सूटून पुण्यास गेले, व आपाजिराव निंबाळकर यांस पुणें मुकामीं कैद केलें. चिमणाजी शंकर शके १७३६ फालगून सन १८१४ या वर्षी सूटून पुण्यास गेले.

पुण्यास जाण्या पूर्वी बाजिराव रघुनाथ पेशावे (मुख्यप्रधान) यांणीं जनार्दन-नारायण देशपांडे यांचे मार्फत निंबाळकराचे आरषांस देण्यास कांहीं ऐवज ही दिला होता.

चिमणाजी शंकर पुण्यास पोंचल्या वर त्यांचा बाजिराव प्रधान यांणीं मोठा सन्मान केला; आणि सर्व प्रकारें बंदोबस्त केला होता; तेव्हां पासून लढायी अखेर बहुत करून पुण्यासच चिमणाजी शंकर पंडित पंतसचीव हे रा

हात असत.

हें वर संक्षिप्त लिहिलें आहे, परंतु निं बाळकराचा बेदा पुष्कळ दिवस होता, आणि मोठा झाला असून तो "लिंबाळकरी" या नावानें प्रसिध्द आहे, जर सविस्तर लिहिला तर फार होईल.

पुढें राधाबाई यांस रोहिडे किल्ल्या वरकांहीं दिवस ठेविली होती.

नंतर शके १७३९।४० सन १८१८ या-वर्षी बाजिराव प्रधान पळाले, तेव्हां त्यांज बरोबर चिमणाजी शंकर ही पंढरपुरानजीक "टेंभुर्णी जवळ" एथपर्यंत होते; इकडे इंग्लिश सरकारचे कमिशनर लार्ड एल्फिन्स्तन साहेब सिव्हगडा वर होते, त्याणीं तुंग व तिकोना वगैरे मुलुख जप्त केला, आणि इकडून-गेलेले वकिलास सांगितलें कीं जर पंत आठ दिवसांत भेटतील तर त्यांचा मुलुख त्यांचे हवालीं होईल.

हें वर्तमान "लिहून लौकर येण्याविषयीं "वकिलानें पत्र लिहिलें; तें टेंभुर्णीस पोंचलें

तेथें त्यांणीं बाजिराव यांचा युक्तिनें निरोप घेऊन सिव्हगडास आले आणि साहेबास भेटले.

साहेबांस भेटले तेव्हां एल्फिनस्टन साहेब व बाळाजि नारायण नातू होते. तेथें साहेब यांणीं सांगितलें कीं आपण आपल्या संस्थानांत जावे, "मोंगलाईंतील खेरिज करून व दायी अखेर चालत आल्या प्रमाणें सर्व अमल चालेल. असें बोलणें होऊन त्या वेळेस तेथें अकरा कलमाचा तह ठरविला.

या तहा मुळें सचिवाचा मोंगलाई-तील सवोत्रा अमल कमारें ५००००।६०००० पन्नास साठ हजार रुपयांचा गेला. हें नुकसान झालें, परंतु असें युध्द व धामधुमीचे प्रसंगीं- असा तह करणें जरूर पडलें असावें. यांत संशय नाहीं.

हा तह झाल्या वर चिमणाजी शंकर भोरास येऊन राहिले.

पुढें इंग्रजी झाल्या वर राधाबाई यांणीं सातान्यास प्रतापसिंह महाराज यांज कडे फिर्याद केली. यांज वरून सातार मुक्कामीं महारा

न व ग्रांटसाहेब रसिदंट यांणी ठराव करून बाईस उपजीविका करण्या करतां दरमहा १६०० रुपये पर्यंत नेमणूक करून दिली.

ती बाई आज पर्यंत जिवंत असून वाई माहुली वगैरे क्षेत्रांत कालक्षेप करीत आहे.

यांणीं श्रीमहायात्रा ही केली. आतां त्यांची बहुतकरून सर्व खटपट राहून त्यांणीं स्नान संध्या सत्कर्मानें कालक्षेप चालविला आहे हें त्यांचे वृध्दावस्थेस योग्य आहे.

पुटें चिमणाजी शंकर यांची शके सत्राशें एकुणपन्नास सन १८२७ इसवी या वर्षी प्रकृति फार बिघडली; आणि त्यांजला औरस पुत्र नव्हता; ह्मणून त्यांणीं आपले पहिले घरचे सापत्न बंधू वामनराव यांस दत्तक घेऊन त्यांचें नांव रघुनाथराव ठेविलें.

शके १७४९ सन १८२७ कार्तिक वद्य चतुर्थी या दिवशीं चिमणाजी शंकर मरण पावले.

रघुनाथ चिमणाजी (रावसाहेब) या

वद्य एकादशी या दिवशीं प्रतापसिव्ह महाराज-यांणीं ४०००० चाळीस हजार रुपये नज़र घेऊन व पंधरा हज़ार रुपये पिलखान्या बद्दल दरसाल घेण्याचे ठरवून दत्तकास कायम केलें, आणि वस्त्रें दिलीं.

रावसाहेब यांचें लग्न गंगाबाई साहेब बाजि व्यंकटेश यांची नात यांज बरोबर दत्तक होण्या पूर्वींचि झालें होतें.

या गंगाबाई साहेब यांस आई साहेब असें ह्मणत असत.

यांचे कारकीर्दीत सन १८२९ शके सत्राशें एकावन्न या वर्षी नागोटणें, अष्टमी, शिमहाल, हवेली, असरें आणि अतोणें एथील दुअमली-गांव व तालुके सरमोबदला करून घेतले; हा मुबला ठाण्याचे इंग्लिश सरकारचे कलेकटर यांज बरोबर झाला. त्यांत सरसगड (पालीचा किल्ला) सचीव यांज कडे आला.

यांचे कारकीर्दीत बहुत करून शके स-त्राशें सत्तावन्न सन १८३५ पर्यंत यांची मातोश्री-

भवानी बाई हीच कारभार करीत होती, त्या का ळांत मुकत्यारी नसल्या मुळें रावसाहेब यांणीं चांगले स्वस्थानें राज्योप भोगानें काळ काढला असें ह्मणवत नाहीं.

शाके १७५२ सन १८३० इसवी या वर्षीं रावसाहेब यांस एक पुत्र झाला होता, तो लहा नपणींच त्याच वर्षीं कार्तिक मासीं मरण पा वला.

रघुनाथ रावसाहेब यांचा आणि त्यांचीमा तुश्री भवानी साहेब यांचा तंटा वाढून शेवटीं त्याचा निकाल मतापसिंह राजे आणि रसिड ट साहेब यांणीं तारिख १५ अक्टंबर सन १८३५ शाके १७५७ साली करून बाईसाहेबांस नेम णूक ठरवून दिलीं, तेव्हां पासून ती बाई सा तान्यास राहून कालक्षेप करीत असत, ती शा के १७७६ फालगुन शुध्द प्रतिपदा इसन १८५४ रोजीं स्वर्गस्थ झाली.

पुढें शाके १७५८ माघ मासीं सन १८३६ इसवी या वर्षीं रावसाहेब यांची प्रकृति फारबि घडली, ह्मणून त्यांणी आपले पहिले परचा सा

पत्नबंधूचा पुत्र बळवंतराव यांस दत्तक घेऊन पुत्र केले; त्यांचें नांव चिमणाजी पंडित- असें ठेविलें.

पुढें रघुनाथराव साहेब शके १७५८ सन १८३६ इसवी माघ शुध्द तृतीया रोजीं कैलासवासी झाले; त्या पुढें त्यांची मातुश्री लक्षुमबाई काकीसाहेब माघ शुध्द चतुर्दशी शके १७५८ या रोजी मरण पावली.

गंगाबाई साहेब ही सुशील विचारीपोक्त असून फार संभावित होती यांजला शके १७६२ सन १८४० या वर्षी माघ वद्य तृतियेस देवाज्ञा झाली.

---

## कारकीर्द
## चिमणाजी रघुनाथ पंतसचीव यांची.

---

चिमणाजी रघुनाथ यांस दत्त घेतल्याव

र यांजला सन १८३८ शके १७६० या वर्षी क
लकत्ता सरकारचे हुकमानें मुंबई सरकारानें
दत्तक मंजूर केलें, आणि सन १८३९ शके स
त्राशें एकसष्ट या वर्षी श्रीमंत छत्रपति शहा
जी राजे ( आपा साहेब महाराज ) यांणीं वस्त्रें
आणि अधिकार दिला.

सन १८३९ शके १७६१ सालांत प्रता
पसिंह राजे आणि शाहाजीराजे यांचें वैमन
स्य येऊन प्रतापसिंह राजा वर फितुराचा आ
रोप आला, तेव्हां शाहाजी उर्फ आपा साहेब म
हाराज साताऱ्या नजीक माळा वर राहिले, त्यां
ज कडे चौकी पाहऱ्यास व बंदोबस्तास माणसें
शिपायी व सामान वगैरे पुष्कळ चांगली नज
वीज चिमणाजी रघुनाथ यांची मातुश्री व कार
भारी यांणीं ठेवली. त्या जवर पुढें प्रतापसिं-
ह राजे हिंदुस्थानांत गेले, आणि शाहाजीरा
जे ( आपा साहेब ) सातारचे गादी वर बसले
तेव्हां त्यांणीं सचिवाचा उपकार पाहून " चि
माणाजी रघुनाथ यांस दत्तक कायम केलें, ते
व्हां १५००० हजार रुपये नवीन घेण्याचे प्र-

तापसिद्ध राजे यांणीं ठरविले होते, ते रुपये घे णाचें माफ केलें.

शाके १७६२ सन १८४० इसवीस शहाजी राजे याणीं चिमणाजी पंडीत यांस चौघडा व अब्दागीर दिली.

चिमणाजी पंडीत यांस नाना साहेब म्हणतात, हे नाना साहेब हल्लीं आहेत, यांस दत्त घेतले, तेव्हा हे लहान, म्हणून कारभार चालविण्यास मातुश्री गंगाबाई यांणीं कारभारी नेमिले, आणि ते इंग्लिश सरकारांनीं पसंत केले; त्यांचीं नांवें.

१ दामोदर मोरेश्वर यांस आन्या असें म्हणात.

२ त्र्यंबकाजी रंगनाथ. ( दादा फडणीस )

३ सदाशिव राव खंडेराव. ( + + + बजाबा नाना शिंदकर )

---

असे कारभारी नेमिले; या पुढें या पैकीं सन १८४० शाके १७६२ सालांत दामोदर मोरेश्वर हक झाले. त्यांचे जागेवर रामचंद्र काशी

( रामजी आपा ) यांस नेमिलें.

त्रिवर्ग कारभारी यांणी शके १७७५ सन १८५३ पर्यंत कारभार केला.

चिमणाजी पंडीत नानासाहेब दौलतीचा कारभार चालविण्यास योग्य व योक्त वयाचे झाल्या वर इंग्लिश सरकारानून मुंबई साकांचे हुकुमानें सातारचे कमिशनर मेहरबान टाईम्स बोगलवी साहेब यांणी शके १७७४ फालगुन शुध्द त्रयोदशी सन १८५२ तारीख २२ मार्च रोजीं चिमणाजी पंडीत यांस आपले दौलतीचा कारभार स्वतंत्रपणें पाहण्याची मुकत्यारी दिली. या मुकत्यारीचें पत्र सरकारास-माहुली मुकामीं पोचलें.

चिमणाजी पंडित यांचे लग्न शके १७६६ जेष्ठ शुध्द सप्तमी सन १८४४ इसवी सालांत-मल्हारराव आंबेकर यांचे कन्ये बरोबर मोर मुकामीं मोठ्या समारंभानें झालें. त्या बाईचें नांव ( वज्र चुडे मंडित सौभाग्यवती सरस्वती बाई ) यांस माईसाहेब ह्मणतात.

चिमणाजी पंडीत याज बरोबर शके १७६२

सन १८४० इसवी सालांत सातारकर महाराज यांचे मुलकांतील दुअमली सर्वात्र अम्मलांचा अमलांतील अंमल काढून परस्पर अंमल मोबदला झाला.

पुढें शके १७७६ सन १८५४ इसवी- चैत्र शुध्द प्रतिपदेचे दिवशीं सुमुहुर्ता वर चिमणाजी पंडीत यांस पुत्र रत्न झालें; यांचें नांव शंकरराव ठेविलें आहे.

शंकरराव साहेबांस रावसाहेब असें ह्मणतात; याचें पहिलें लग्न माघ शुध्द नवमी शके १७८३ सन १८६१ या वर्षी माधवराव विठ्ठल विंचुरकर यांचे कन्ये बरोबर भोर मुकामी झालें,

हा लग्न समारंभ भोर मुकामीं फार मोठा, आणि मौजेचा झाला. या समारंभास पंडित प्रतिनिधी, फलटणकर, इफळे जहागिरदार असे पुष्कळ सरदार व मानकरी व शास्त्री पंडित गुणीजन आले होते;

या लग्नास सुमारें एक लक्ष रुपयांहून अधिक खर्च झाला, लग्न झाल्या वर विंचूर

कर परत गेले; त्याज बरोबर लग्न झालेली नवरी ही असून त्या नवरे मुलीचा वाटेने महामारीचा वारवा होऊन विंचुर मुकामीं फालगुन शुध्द ३ शके १७८३ ह्मणजे लग्न झाल्या वर पंचवीस दिवसांचे आंत त्या बाईस देवाज्ञा झाली. लग्न समारंभ होसेनें व मोठा झाला; दोन्ही सरदार व्याही यांजला-आनंद झाला; इतक्यांत अकस्मात असेंज हाल्या मुळें त्यांस आणि लोकांस किती दुःख झालें असेल; ते वाचणारांनीं ध्यानांत आणावें मी उगाच दुःखाची चर्ईक लिहून ग्रंथ वाढवित नाहीं.

पुढे रावसाहेब यांचे दुसरें लग्न कृष्णराव विठ्ठल विंचुरकर यांचे कन्ये बरोबर माघशुध्द ४ शके १७८४ सन १८६२ सालांत झालें.

हा लग्न समारंभ नसरापूर मुकामीं भोरा पासून चारकोसा वर झाला. या बाईचें नांव सौभाग्यवति शिऊबाई साहेब असें ठेविलें आहे; ह्या बाई लग्नात ३॥ वर्षांच्या असून हल्लीं सुमारें ४॥ वर्षांच्या आहेत; हा जोडा फार उ

त्तम आहे.

या पूर्वोक्त दोनी लग्नांत सचीव पंडित आणि विचूरकर या दोनी सरकारचे मध्यस्तींत बापुजी पांडुरंग पाटणकर व विष्णू गोपाळ भिडे हे होते.

मग शके १७८४ सन १८६२ इसवीस "सचीव पंडीत व यांचे वंशास आपले राज्यावर अधिकारी करण्यास जेव्हां औरस नसेल तेव्हां दत्त घेण्यास परवानगी आहे, आणि ही परवानगी निरंतर राहील" ह्मणून नामदार राणी सरकारचे मंजुरीची सनद नामदार लार्ड क्यानिंग साहेब व्हायसराय व कलकत्त्याचे गवरनर जनरल यांणीं पाठविली ती मुंबई सरकारांतून सातारचे कलेकटर मेहरबान जॉर्ज इनविरारिटी साहेब यांचे मार्फत भोरास येऊन पोंचली; ती सनद पोंचल्या वर ही सनद राज्याचा दृढपायाचे होय. ईश्वर इछेनें आपल्यास औरस वंश आहे, आणि पुढें ही होईल; परंतु काला तरानें कारण पडल्यास ही सनद उ

पकारक होईल ह्मणून ही सनद घेण्या कर तां नानासाहेब पंडीत यांणीं सभा करून त्या सभेंत गवरनरजनरल व राणी सरकार यांचे आभार मानून सनद घेतली.

(हल्लीं या सरकारचे ताब्यांत किल्ले
व मुलुख आहे तो ÷)

रोहिडा (विचित्रगड, राजगड, सुधा गड भोरपचा किल्ला, तोरणा (प्रचंडगड), वितंडगड, सरसगड, कठीणगड.

इतके तालुके व किल्ले आहेत; शिवा य वतनी देशपांडे व कुळकर्णीपण रोहिड खोऱ्यांत व वेळवंडखोऱ्यांत आहे; या शि वाय इनाम गांव व इसाफत गांव व शेऱ्या आ हेत; यांचें उत्पन्न कमाल तीन लक्ष रुपयांचे आहे; या खेरिज मोंगलाईंत गेलेला सवोत्रा खेरीज बाकी सवोत्रा हल्लीं सुमारें पन्नास सा ठ हजाराचें उत्पन्न आहे; या उत्पन्नांत कि ल्ले व गडकरी वगैरे यांच्या दुमाले नेमणुका वगैरे पुष्कळ खर्च जाऊन खजिन्यांत सु मारें दीड लक्ष रुपये येतात; इतका खर्च हु

जूर आहे; वर्षांतून बारापंधरा हजार रुपये-पर्यंत इमारत खर्च व दहा हजार रुपयेपर्यंत देहेनगी खर्च होतो.

या इलाख्यांत प्रजा सुमारें बारालक्ष पर्यंत आहे.

या सचिवाचे वंशपरंपरेने यांचे राजधानींत भोर एथें श्रीरामनवमीचा उछाह चैत्रमासीं मोठ्या समारंभानें होत असतो.

चिमणाजी पंडित नानासाहेब यांणीं आपले कारकीर्दीत आपले राज्यधानींत भोरएथें सडका रस्ते व निरानदीस घाट धरण वगैरे लोकोपयोगी पुष्कळ कारखाने व इमारती केल्या. व रस्त्यांतून रात्रीचे दिवे वगैरे भोरांत लावण्याची चाल केली. यांणीं भांबवडीचा बाग ह्मणून भोरापासून एक कोशावर जळमंदीर बाग उत्तम मजेचा बांधला आहे. अशीं यांनीं अनेक चांगलीं कृत्यें केलीं.

चिमणाजी पंडित लहान होते; तेव्हां दौलतीचा कारभार चालविण्यास कारभारी नेमिले होते, त्यांज कडून दौलतीचे जमाखर्चाचा

हिशेब दरसाल इंग्लिश सरकारांत जात हो
ता.

पुढें चिमणाजी रघुनाथ यांस मुकत्यारी
आली; तेव्हा त्यांज पासून ह्या दौलतीस क
र्ज आहे; वगैरे कारणानें हिशेब द्यावा लाग
त होता; परंतु आतां दौलतीस कर्ज नाहीं;
व कारभारी यांज प्रमाणें हिशेब देणें जरूर
नाहीं; असें समजून त्यांणीं मुंबई सरकारा
रास लिहून काम चालविलें.

या गोष्टीचा मुंबई सरकारांनीं योग्य न्या
यानें विचार करून शके १७८५ सन १८६३
इसवी साला पासून हिशेब घेण्याचें कार
ण नाहीं; ह्मणून साताराचे कलेक्टर साहे
ब बहादुर यांस हुकूम दिला.

ही गोष्ट मुंबई सरकारानें न्याया प्रमा
णें केली; या कारणानें नामदार सरबार्टर-
फ्रियर साहेब मुंबईचे गवरनर यांचे पंत सा
हेब फार आभारी आहेत.

चिमणाजी पंडीत सचीव यांणीं आपले
राज्यांत न्यायाची रीत उत्तम प्रकारची ठेवि

ली आहे; स्वतः सर्व कामें नियमानें वेळचे वेळेस पाहतात; आणि ते फार चतुर, विद्वान् आणि हुशार आहेत; या मुळें अनेक रीतीनें सुधारणा होऊन रयतेस सुख आहे.

याजला ईश्वर इच्छेनें चिरंजीव आहेत व त्याची बुध्दि फार चांगली आहे, ह्मणून-चिमणाजी पंडित यांणीं आपलें अवश्य कर्तव्य जें ( चिरंजीवास उत्तम विद्याभ्यास करविणें, व नीति प्रवीण करणें; ) ही गोष्ट करण्यास अशा अमोलिक वेळेस विसरूनये ही प्रार्थना आहे.

समाप्त.

# सातारचे छत्रपतीमहाराज यांचे अष्ट प्रधानांतील मुजुमदार (पंतआमात्य) यांचे वंशाचा इतिहास.

---

बाळकृष्णापंत हणमंते व सोनोपंत म्हणून शिवाजीमहाराज यांचे बाप शाहाजी भोसले याजपाशीं कारकून होते.

शके १५४८ सन १६२६ इसवी साली शाहाजीची स्त्री जिजाबाई गरोदार होती तिजला शिवनेरीचे किल्यावर ठेवून शाहाजी विजापुरास गेले तेव्हां त्या बाईपाशीं बाळकृष्णापंत आणि सोनोपंत यांस ठेविलेंहोते.

शिवनेरीकिल्यावर शिवाजीमहाराजांचा जन्म झाल्या पासून ते मोठे होउन राज्यकारणाच्या मसलती करूंलागले तेथपर्यंत बाळकृष्णापंत व सोनोपंत त्याजपाशींच होते.

शके १५६३ सन १६४१ चे सुमारास प्रथम बाळकृष्णापंत हणमंते यांस शिवाजीमहाराज यांणीं मुजूमदार ही पदवी दिली.

शके १५६६ सन १६४४ चे वर्षी शिवाजीमहाराजानीं कोंकणांत तळे, घोसाळे हे किल्ले घेतले त्यांजबरोबर सो

नोपंताचा मुलगा निळोसोनदेव होता त्याणें फार मर्दुमी केली व पुरंदर किल्ला घेतला म्हणून शिवाजीनीं शके १५६९ सन १६४७ इसवीचे सुमारास बाळकृष्णापंत यांजकडून मुजूमदारीचा दरक काढून तें पद निळोसोनदेव उर्फ आबाजीसोनदेव यांस दिलें.

शके १५८८ सन १६६६ इसवीचे सुमारास शिवाजीमहाराज दिल्लीस गेले तेव्हां मागें त्यांणीं काबीज केलेले मुलखाचें बंदोबस्तास जे तीन मुख्य कारभारी होते त्यांत निळोसोनदेव हे होते.

शके १५९६ सन १६७४ इसवी सालीं राज्याभिषेक झाला तेव्हां अष्टप्रधानाचीं नांवें फारसी भाषेंत होतीं तीं संस्कृतभाषेंत ठेविलीं त्यांत मुजूमदार यास पंतआमात्य असें नांव दिलें आणि हें पद निळोपंत यांचे वडील पुत्र रामचंद्रपंत यांस दिलें.

पंतआमात्य यांचे राजमंडळांत असें काम होतें कीं दप्तरचे लिहिणें व सर्वकारखान्याची एकबेर्जीव स्वराज्यांतील जमाखर्चाची चौकशी करावी असें होतें आणि राजपत्रावर लेखनालंकार व बारसुद व तारीख इतकीं निशाणीं होतहोतीं महाराजाकडून पंतआमात्य यांस पत्र लिहिणेंतें वर राजश्री नांव

लिहून पंडीत असें लिहून शेवटीं बहुतकाय लिहि णें सुज्ञ असा असें लिहिण्याची चाल होती.

आमात्यपदाचीं वस्त्रें झालीं व पुढें नवीं वस्त्रें झालीं तेव्हां महाराजाकडून वस्त्रें व जवाहीर खालीं लिहिल्याप्रमाणें देण्याची चाल होती.

वस्त्रें.

१ प्रथम भेटीसमयीं चादरछडीदार.

१ पदाचीं वस्त्रें मंदील, चादरछडीदार, जामेवार, किनखाप, पटका

---

१ शिकेकटार.

१ शस्त्रें, तलवार, ढाल

१ हत्ती, घोडा.

१ जवाहीर दागिने चार-शिरपेच, कंठी मोत्याची, चौकडा मोत्याचा, तुरा मोत्यांचा.

१ चौरी रूप्याचे दांडीची.

१ कलमदान ताडीचें.

---

या प्रमाणें देण्याची चाल होती आणि आमात्य यांणीं महाराजास भेटीचे वेळेस कांहीं मोहरा नजर

करण्यालागत. ( बहुतकरून पंधरामोहरा नजर द्या व्यालागत. )

संभाजीमहाराज यांचे कारकीर्दीत शके १६०२ सन १६८० पासून शके १६१० सन १६८८ पर्यंत त्यांचे दुष्टस्वभावामुळें रामचंद्रनिळो हे बहुतकरून घरींच होते तथापि पदाची कांहीं उलटापालट झालीनाहीं.

शके १६१० सन १६८८ चे सालीं राजाराममहाराज कर्नाटकप्रांतांत गेले त्यांचे कबिले ( स्त्रिया ) विशाळगडावर होत्या त्यांजला महाराजाकडे जळमार्गानें मोठे युक्तीनें पोंचविल्या व महाराज तिकडे असतां रामचंद्रपंत यांणीं पुष्कळ फौज जमवून विशाळगड व रांगणा किल्ले वगैरे मावळांतील शिवाजी महाराज यांचा मुलुख मोंगलाचे हातात गेलेला सोडवून घेण्यांत पराक्रम केला.

शके १६१४ सन १६९२ सालीं रामचंद्र निळकंठ यांस चंदीहून राजाराममहाराज यांणीं हुकुमतपन्हा असा किताब पाठविला.

चंदीचंदावरा कडे राजाराममहाराज गेले त्यांजबरोबर जनार्दन नारायण हणमंते सुमंत हे होते; त्यांणीं फार उपयोग केला म्हणून शके १६१४ सन

१६९२

चे साली राजाराममहाराज यांणीं तिकडे अष्टप्रधान नेमिले त्यांत जनार्दननारायण यांस आमात्यपद दिलें.

शके १६१९ सन १६९७ इसवीचे सुमारास राजाराममहाराज विशाळगडास आले तेव्हां चंदीकडे असतां रामचंद्र निळकंठ यांणीं इकडे मावळ व कोंकणांत पराक्रम केला म्हणून त्यांजकडे आमात्यपद कायम ठेवून जनार्दनपंत हणमंते यांस दुसरा अधिकार दिला.

शके १६२१ सन १६९९ इसवीचे सुमारें राजाराममहाराज वारल्यानंतर त्यांचे मागें त्यांची स्त्री ताराबाई ही आपला मुलगा अज्ञान शिवाजी यांचे नावें राज्यकारभार चालवूंलागली तेव्हां त्याजपाशीं रामचंद्र निळकंठ होते. शके १७२९ सन १७०७ इसवी या वर्षी शाहुमहाराज मोंगलाचे कैदेंतून सुटून दक्षिणेंत आले तेव्हां ताराबाईशीं इमान गुंतल्या मुळें रामचंद्रनिळकंठ त्यांजवरोबर गेले नंतर राजाराम महाराज यांचें दुसरे पुत्र संभाजी यांणीं करवीरा कडे आपली राजधानी केली तिकडे रामचंद्रपंत राहिले.

इकडे शाहुमहाराज दक्षणेंत आले तेव्हां त्यांज बरोबर गदाधरभट नाशीकर म्हणून होता त्याणें वाटेनें फार मदत केली व सहाय्य केलें म्हणून शाहुमहाराजानीं शके १६२९ सन १७०७ इसवी सालीं त्यांजला आमात्य पदवी दिली.

शके १६३० सन १७०८ चे सुमारास बाळकृष्णापंत व जनार्दनपंत हणमंते यांचे बंधु आबुराव शाहु महाराजास येउन भेटले तेव्हां ते पुरातन व हुशार असें जाणून त्यास आमात्य पदवी गदाधर यांज कडील काढून शाहुमहाराजानीं दिली.

शके १६६१ सन १७३९ इसवीचे सुमारास आबुराव मयत झाले त्यांचे बंधुचे पुत्र आपाजीबाबुराव यांस शाहुमहाराजानीं आमात्यपदाचीं वस्त्रें दिलीं.

शाहुमहाराज मेल्या वर शके १६७२ सन १७५० इसवी सालीं सातान्याचे नजीक सांगोळ्याचे मुक्कामीं रामराजानीं अष्टप्रधान केले त्यांत आपाजीराव यांजकडून आमात्यपद काढून रामचंद्रपंत बावडेकर यांचे पुत्र+ भगवंतराव यांजला श्रीपतराव प्रतीनिधी यांचे रदबदलीमुळें दिलें.

शके १७०० सन १७७८ इसवी नंतर शाहुमहारा

+ यासच शिवरामपंत म्हणत

जांचे कारकीर्दीस शिवरामपंत यांचे नातु सर्वोत्तम बाबुराव यांजला धाकटे शाहुमहाराजानीं आमात्यपद दिलें.

प्रतापसिंव्हमहाराजाचे वेळेस शके १७५१ सन १८२९ इसवी सालीं सर्वोत्तम बाबुराव सातान्यास राहात होते त्यांजकडे जमिनी व मोकासे वगैरे दाहाहजाररुपयांचें उत्पन्न व पांचहजाररुपये पेनशान इंग्रजसरकारांतून या प्रमाणें चालत होतें.

सर्वोत्तमबाबुराव यांजला औरसपुत्र नसल्या मुळें त्यांणीं भिकराव भास्कर नंदगांवकर यांचा पुत्र बाबा यांस दत्तक घेतलें ते बाबा सर्वोत्तम असतांनाच मेले. पुढें सर्वोत्तमबाबुराव मरणपावल्या नंतर प्रतापसिंव्हमहाराजानीं आमात्यपदवी बापुकान्हे फडणवीस यांस दिली त्यांची माहिती खालीं लिहिण्यांत येतआहे.

गोपाळ महादेव खांडेकर हे शिवाजी व संभाजी महाराज यांजपाशीं होते त्यांचे पुत्र धोंडोगोपाळ यांस शाहुमहाराजानीं फडणवीशीचा दरक दिला तो वारल्यावर रामराजे यांचे कारकीर्दीत कान्होधोंडदेव यांजकडून पेशव्यानीं फडणवीशीचा दरक का

ढून आपले तर्फे दुसरे कामगार ठेविले.

धाकटे शाहुमहाराजाकडून बाजिरावसाहेबप्रधान यांजकडे महाराजांचे नेमणुके बद्दल वगैरे ठराव करून घेण्यास चतरसिंगराजेभोसले गेले त्यांजबरोबर बापुकान्हो हे होते ते स्वदेशीं आठ व हिंदुस्थानांत सहा मिळून चौदावर्षे होते नंतर चतरसिंगराजा बरोबर बाजिरावाचे हुकुमानें त्रिंबकजी डेंगळे यांणीं नाशिकचे नजीक माळेगावमुकामीं कैद करून जुनरा नजीक जिवधन किल्यावर कैदेंत ठेविलें.

शके १७३९ सन १८१७ सालांत इंग्रजीअम्मल झाल्यावर ते कैदेंतून सुटून सातान्यास आले तेव्हां त्यांजला खासगीकडील फडणीवीशीचें काम प्रताप सिव्हमहाराज यांणीं सांगितलें नंतर ते पुण्यास महाराजसरकारचे नोकरलोक व आप्तयांचे लढाई अखेर चालतआलेले सरंजाम चालण्या बद्दलच्या सनदा आणण्यास मेहरबान एल्फिन्स्तनसाहेब बहादुर यांजकडे प्रतापसिव्हमहाराजानीं पाठविलें.

शके १७३९ सन १८१७ चे सुमारें मेहेरबान ग्रांटसाहेबबहादुर यांणीं कृष्णारावकानेरे यांस सातान्यास फडणवीशीचे कामावर ठेविलें नंतर शके१७४९

सन १८२७ इसवी सालीं कृष्णाराव मेल्या वर बापू कान्हो यांस प्रतापसिंह महाराजानीं दौलतीकडील फडणावीशी सांगितली

शके १७५३ सन १८३१ सालीं बापूकान्हो यांस आमात्यपद प्रतापसिंहमहाराजानीं दिलें ते बापुकान्हो शके १७५९ सन १८३७ इसवीचे सुमारें मरण पावले त्यांचे बंधूचे पुत्र त्यांणीं दत्तक घेतले त्यांचें नाव सखारामबापूजी त्यांजकडे फडणवीशीचा दरक कायम असून पुढें शके १७६६ सन १८४४ इसवी तारीख २० अक्टोबर रोजीं त्यांस आपासाहेबमहाराज यांणीं आमात्यपद दिलें त्यांजकडे आमात्यपदाचे संबंधानें कांहीं नवीन उत्पन्न दिलें नाहीं, परंतु फडणीवीशी बद्दल त्यांस दरमहा ५०० रुपये व एक इनाम गाव आणि सुमारें ५०० रुपयांची इनामजमीन इतकें चालत होतें.

सातारचें राज्य इंग्रजसरकारांत आल्यानंतर मुबई इलाख्यास जे याहिंदुस्थानचे पुरे माहितगार आणि सातारचे राज्यांतील लोकाविषयीं ज्यांस पुरीमाहिती आहे व यादेशांतील वडें लोकांचा कळवळा बाळगणारे नामदारसरबाररत्लक्लार्कसाहेब हे गव्हर

नर होउन आले त्यांणीं सखारामबापुजी यांची हुशारी, प्रमाणिकपणा व राजनिष्ठपणा जाणून त्याचे घराण्यास कांहीं इनामीउत्पन्न करून देण्याविषयीं बंगालासरकारचे मार्फत महाराणीसरकारास लिहिलें इतके संधींत शके १७८४ सन १८६२ ईसवी तारीख १० जूनरोजीं सखारामबापुजी स्वर्गस्त झाले.

नंबर ४ तारीख १६ जानेवारी सन १८६३ इसवीचा महाराणीसरकारचा ठराव हिंदुस्थानचे सेक्रटरीसाहेब सरचार्लसउड यांचे मार्फत बंगालसरकारांत येउन त्याजवरून सातारचे कलेक्टरसाहेब मार्फत मौजे चिंचणेर तालुके सातारा हा गांव दोनहजाराचे दरसाल उत्पन्नाचा शके १७८५ सन १८६३ इसवी सालीं सखाराम बापुजी यांचे वंशास मिळाला सखारामबापुजी यांस नारायणराव, माधवराव, वासुदेवराव आणि केशवराव असे चार पुत्र आहेत.

---

समाप्त.

# सातारचे छत्रपति महाराज यांचे अष्टप्रधानांतील मंत्री (वाकनीस) यांचे वंशाचा-इतिहास.

---

शके १५६६ सन १६४४ इसवीस शिवाजीमहाराज यांणीं कोंकणांत तळें, घोसाळें हे किल्ले घेतले तेव्हां त्याज बरोबर गंगुमंगाजी म्हणून होता तो हुशार व शूर होता म्हणून शिवाजीचा त्याजवर लोभ असे.

शके १५६९ सन १६४७ इसवीस शिवाजीमहाराजानीं अष्टप्रधानाचीं नांवें फारशीभाषेंत ठेविलीं तेव्हां गंगुमंगाजी यांस वाकनीस हें पद दिलें.

नंतर शके १५८६ सन १६६४ इसवीचे सुमारास गंगुमंगाजी याजवर गैरमर्जी झाल्यामुळें त्याजकडून वाकनीशीचें पद काढून दत्ताजीत्रिमल्ल म्हणून पागेकडे कारकून होता तो फार हुशार होता म्हणून त्यांस वाकनिशी सांगितली.

दत्ताजी त्रिमल्ल याजकडे वाईपासून कोल्हापुरपर्यंत मुलुखाची मामलत सांगितलीहोती.

शके १५९६ सन १६७४ इसवीस राज्याभिषेका

चे वेळेस अष्टप्रधानाचीं नावें संस्कृतभाषेंत ठेविलीं त्यांत वाकनीस यांस मंत्री असें नाव व पद दिलें ते व्हां दत्तोत्रिमल मंत्री होते.

मंत्रीयांचे राजमंडळांत असें काम होतें कीं मुदब खाची तर्तुद राखावी, आमंत्रण करावे व मसलतींत असावे. आणि राजपत्रावर संमत, मंत्री व बार अशीं निशाणें करावीं. राजाकडून मंत्री यांस पत्र लिहिणें तें व र राजश्री (नाव लिहून) पंडित असें लिहून शेवटीं बहुत काय लिहिणें सुज्ञ असा. असें लिहिण्याची चाल होती.

मंत्रीपदास वस्त्रें देणें तीं खालीं लिहिल्याप्र माणें देत होते.

वस्त्रें.

१ प्रथम भेटीचे वेळेस चादरछडीदार.
१ पदाचीं वस्त्रें- मंदील, चादरछडीदार, जामेवार किनखाप, पटका
१ शिकेकटार.
१ तलवार, ढाल.
१ हत्ती, घोडा.
१ जवाहिर- शिरपेच चौकडा मोत्याचा, कंठीमो-

त्याची, तुरामोत्याचा.
१ चौरी रुप्याचे दांडीची.

---

या प्रमाणें देण्याची चाल होती; आणि मंत्री यांणीं महाराजांस भेटीचे वेळेस कांहीं मोहरा नजर करा-व्या लागत. (बहुतकरून दाहा मोहरा नजर कराव्या लागत.)

शके १६२९ सन १७०७ इसवीस शाहुमहाराज दक्षणेंत आले त्यांजला जेजुरीचे मुकामीं दत्ताजीत्रिमळ जाउन मिळाले, तेव्हां महाराजानीं त्यांस राजाज्ञा ही पदवी दिली. आणि मंत्रीपदाचा अधिकार रामचंद्र त्रिंबक पुंडे यांस दिला.

शके १६३५ सन १७१३ चे सुमारें चंद्रसेनजाधवरावसेनापति शाहुमहाराजाशीं बिघडून मोंगलाईंत गेले तेव्हां त्याचे पदरीं नारोरामशेणवी म्हणूनबालेघाटचेवगैरे मामलेकरीतहोते ते शाहुमहाराजास येऊन भेटले तेव्हां शाहुमहाराजानीं त्यास (रामचंद्रपंत पुंडे) यांस काढून मंत्रीपदाचा अधिकार दिला.

कोंकणप्रांतांत रत्नागिरीजिल्ह्यांतील मालवणतालुक्यांत सावताचे वाडीनजीक कोचरें म्हणून गांवआ

हे तेथील कुळकर्णी व त्या गांवचे राहाणारे रामशे णवी यांचे पुत्र नारोराम हे शके १६२९ सन १७०७ चे सुमारास जाधवराव यांजपाशीं येउन राहिले ना रोराम यांस दुसरे दोन बंधु नरहर व भास्कर असे होते.

वालेघाटचे मामले व कांहीं सरदेशमुखीची गु मस्तेगिरी याप्रमाणें शाहुमहाराजानीं नारोराम यांज कडे सांगितलें त्यास सुमारें २०००रुपयांचे उत्पन्न दि लें तें पुढें तपशिलवार लिहिण्यांत येईल.

या प्रमाणें पदाचा अधिकार मिळाल्यावर नारोरा म आपले बंधुसहसातारजिल्ह्यांत बागणी म्हणून गां व आहे तेथें राहूंलागले त्यांजला बागणी हा गांव इ नाम असून तो हल्लीं नारोराम यांचे बंधू भास्कर यांचे वंशाकडे चालत आहे.

शके १६७० सन १७४८ सालीं नारोराम मरण पावले; तेव्हां त्यांचे बंधू नरहर यांचा पुत्र घनःशाम यां स घनःशाम नारायण असें नांव ठेवून त्यांस शाहुमहा राजानीं मंत्रीपदाचीं वस्त्रें दिलीं. त्यांजकडे सरदेशमु खीचें गांव व कांहीं फुटगांव मोंगलाईंतील वगैरे उ त्पन्न नेमून दिलें व अजाहुन सरदेशमुखमुता-

ठीक असा एक दुसरा अधिकार घनःशाम यांचा चुलतबंधु त्रिंबकराव भास्कर यांस दिला.

शके १७१३ सन १७९१ चे सुमारें प्रधान यांचे कारभारी हरिपंत फडके यांणीं वागणी हा गांव मंत्री यांजकडून घेउन (नारोराम मूळपुरुष) यांचे सखेबंधु भास्कर यांचा पणतू विठलभास्कर यांस दिला; आणि सरदेशमुखीची वहिवाट बहुतकरून मंत्री यांजकडील काढली.

नंतर धाकटेरामराजे यांचे कारकीर्दीत घनःशामराव मरण पावले त्यांचे पुत्र रघुनाथघनःशाम यांस मंत्रीपदाचीं वस्त्रें दिलीं हे रघुनाथराव सातारइलाख्यांत सातान्याचे दक्षणेस वीसकोशावर इसलामपूर म्हणून गांव आहे तेथें मंत्री यांचे ठाणें होतें त्यागावांत येउन राहिले.

रघुनाथराव यांचे बंधु नारायणघनःशाम यांचा व त्यांचा तंटा चालल्या वरून पंतप्रधान यांचे कारभारी हरिपंत फडके यांणीं मंत्री यांचे उत्पन्नातून नारायणराव यांस दरसाल ८००० चें उत्पन्न नेमून दिलें तें नारायणराव सातारइलाख्यांत मौजे कोपरडें म्हणून गांव आहे त्या लगत तुकाईचे वाडीस राहिले त्यां

चा वंश हल्लीं तेथें आहे.

शके १७२२ सन १८०० चे सुमारें बाजीरावप्र धान यांचे कारभारी बाळोजी कुंजीर यांणीं मंत्रीक डील इसलामपूरचेंठाणें घेतलें; हल्लीं तेथें मंत्रीं सुख वस्तुसारखे आहेत.

धाकटेशाहुमहाराज यांचे कारकीर्दीस रघुनाथ राव धारले त्यांचे पुत्र जैवंतराव व बचाजीराव. यांतू न जैवंतराव यांस मंत्रीपदाचीं वस्त्रें शाहुमहाराजा नीं दिलीं

शके १७५१ सन १८२९ इसचीस प्रतापसिंह म हाराजाचे कारकीर्दीस जैवंतराव मंत्री होते आणित्यां जकडे उत्पन्न चालत होतें ते.

२५०० परगणें नसिराबाद प्रांत खानदेश एथील बाबती.

१००० वेरूळ प्रांतीं तीन गांव आहेत.

७००० मौजे शेलगाव पेदारखानापूर.

१७०० खानदेशप्रांतांत कसबे पडेल व मौजे नांद गांव वगैरे गांवीं मोकासा.

२८०० नगरजिल्ह्यांत तालुके राहुरी- एकवीस. व गैरे एथील बाबती.

२५०० मौजे आसनगाव तालुके सातारा व मौजे को
ळें तालुके कन्हाड.

१००० सातारइलाख्यांत किरकोळ कांहींजमिनी व
कोरेगांव आणि वाईतालुक्यांत नाडगौंडीपणा
चे वतन आहे.

---

या प्रमाणें उत्पन्न चालतहोतें तें बहुतकरूनहल्लीं
चालत आहे.

जैवंतराव यांस पुत्र नसल्यामुळें त्यांणीं आपले
बंधु बचाजी यांचा पुत्र रघुनाथराव (बचाजी यांस एक
पुत्र रघुनाथहोता.) शके १७५१ सन १८२९ चें सुमारें द
त्तक घेतला.

प्रतापसिंह महाराज याचे कारकीर्दीस जैवंतरावम
रण पावल्यानंतर रघुनाथराव यांजकडे मंत्रीपदाचाअ
धिकार कायम होता.

ते रघुनाथराव हल्लीं कायम असून त्यांचें वयसु
मारें साठवर्षांचें आहे त्यांजला आनंदराव उमर वर्षे २५
व माधवराव उमर वर्षे २० असे दोन पुत्र आहेत.

या प्रमाणें वंश आहे.

---

# सातारचे छत्रपति महाराज यांचे अष्टप्रधानांतील सरनोबत (सेनापति) यांचे वंशाचा इतिहास.

---

शिवाजीमहाराजांस अभिषेक होण्यापूर्वी सरनोबत असा अधिकार फारशीभाषेंतील नावानें होता तोच संस्कृतभाषेंत राज्याभिषेकाचे वेळेस सेनापति म्हणून झाला. सेनापति या पदाचा अधिकार अष्टप्रधानांतील पांचवा आहे. आणि फौज जमा करून पर राजाशी लढायी करावी. व फौजेची तयारी व देखरेख ठेवावी असें सेनापतीचें काम आहे.

(सेनापतिपदाचीं वस्त्रें खालीं लिहिल्याप्रमाणें देण्याचीं चाल होती.)

## वस्त्रें.

१ प्रथम भेटीसमचीं चादरछडीदार.

१ पदाचीं वस्त्रें — मंदील, चादर, जामेवार, किनखाप, पटका.

१ शिकेकटार.

१ शस्त्रें - तलवार, ढाल.

१ जरिपटका.

१ चौघडा

१ हत्ती, घोडा

१ जवाहिर, शिरपेच, मोत्याचा तुरा, चौकडा मोत्याचा, कंठी मोत्याची, जेहेगा.

१ चौरी सोन्याचे दांडीची.

---

या प्रमाणे देण्याची चाल होती.

सेनापति ही पदवी कोणते राजानीं कोणास दिली याची माहिती.-

शिवाजीचे लष्करांत मोठे मोठे शूर व लढायी करणारे असे सरदार शिवाजीमहाराजांचे लोभांतील पुष्कळ होते. त्यांतून प्रथम शके १५६३ सन १६४१ इसवीस शिवाजीमहाराजांनीं आपले फौजेंत एक अधिकारी करून त्यास सरनोबत असें नाव दिलें. आणि ही पदवी प्रथम माणकोजी दाताडे यांस दिली.

माणकोजी मेल्या वर शके १५६९ सन १६४७ इसवीचे सुमारें नेताजीपालकर यास सरनोबत ही

पदवी दिली.

शके १५८० सन १६५८ इसवीचे सुमारास अफझुलखान यास प्रतापगड किल्यावर शिवाजीमहाराजांनीं मारलें तेव्हां नेताजीपालकर याणें मोंगली फौजेचा लढायी करून फार नाश केला.

शके १५८४ शके १६६२ इसवीचे सुमारास नेताजीपालकर याणें शिवाजीमहाराज यांचा कांहीं हुकूम अमान्य केल्यामुळें राजगड किल्याचा सरनोबत प्रतापराव गुजर यास सरनोबत ही पदवी दिली. हा प्रतापराव शिवाजीनीं मोंगलीफौजेबरोबर ज्या ज्या लढाया केल्या त्यांत असून मोठा यशस्वी व शूर असे त्याणें आपले कृत्यावरून दाखविलें. व शिवाजीबरोबर तो दिल्लीकडे गेलाहोता.

शके १५९३ सन १६७१ इसवीचे सुमारास रणमस्तखान व बहलोलखान यांजबरोबर पन्हळीप्रांतांत प्रतापराव सरनोबत यांची लढायी होऊन त्यांत प्रतापराव यांस जेजलेचा गोळा लागून ठार झाला. त्याप्रतापरावाचें लष्करांत धांडपरगण्याचा देशमुख हासाजीराव मोहिते म्हणून दुसरा एक सरदार होता त्याणें रणमस्तखानव बहलोलखान यांचा अगदीं पराभव के

ला म्हणून त्या हासाजीस शिवाजीनी हंबीरराव अ सा किताब देऊन सरनोबत ही पदवी दिली. त्या हसाजीचे लष्करांत संताजीघोरपडे धनाजीजाधव, व्यंकोजीखांडेकर व बकाजीफरजंद हे मोठे पराक्रमीहोते म्हणून त्यास जुमलेदारी (फौजचे भागाचा अधिकार) दिला.

शके १५९६ सन १६७४ इसवी सालीं शिवाजी महाराजास राज्याभिषेक झाला तेव्हां हासाजीरावमोहिते हंबीरराव हेच सेनापति होते.

शिवाजीचे मरणानंतर शके १६०५ सन१६८३ इसवीचे सुमारें संभाजीमहाराजांचे पराभवाकरतां मोंगलीफोज कृष्णातिरीं वाई एथें आली तेथें लढायी होउन त्यांत हासाजीराव मरण पावला.

संभाजीस मोंगलानीं धरून नेल्यावर राजाराम कर्नाटकांत चंदीकडे गेले तेव्हां त्यांजबरोबर महादजी नाईकपानसबळ, संताजीघोरपडे, धनाजीजाधव आणि खंडेराव दाभाडे हे शिवाजीचे वेळेचे लष्करी सरदार होते.

शके १६१४ सन १६९२ इसवी सालीं चंदीचे मुक्कामीं माहादजीनाईक पानसबळ यास राजाराममहा

राज यांणीं सेनापति हें पद दिलें तो थोडेंच महिन्यां
त मेला म्हणून सेनापति हा अधिकार संताजीघोर
पडे यांस दिला. त्याणें आपसांत दुसरे सरदाराबरो
बर लढायी करून अमर्यादा केली म्हणून त्यास ध
रून मारला आणि सेनापति ही पदवी राजाराममहा
राज यांणीं धनाजीजाधवराव यास दिली.

धनाजीजाधवराव याणें औरंगजेब यांचे सरदा
राबरोबर मोठ्या लढाया करून तो राजाराम महा
राज यांजबरोबर दक्षणप्रांतांत आला.

शके १६२९ सन १७०७ चे सुमारें शाहुमहारा
ज दिल्लीहून आले. तेव्हां धनाजीहा ताराबाईकडू
न शाहुमहाराजांचे पराभवास गेला. पुण्याचे न
जीक खेडकडूस गांवावर लहानशी लढायी होउन
शाहुमहाराज खरा अधिकारी असें वळखून सेना
पति त्यांस जाउन मिळाले तेथें शाहुमहाराज यांणीं
त्यांचा सन्मान करून सीमातिरीं त्यास सेनापतिप-
दाचीं वस्त्रें दिलीं.

सेनापतीचे लष्करांत त्याचे पदरीं एक कारकू
न बाळाजी विश्वनाथ भट (हेच पुढें प्रधान झाले.)
हे होते. व त्यांजकडे ५००० स्वाराची सरदारी होती.

शके १६३२ सन १७१० चे सुमारास धनाजी जाध व मरण पावल्या नंतर शाहुमहाराजानीं धनाजीचा पुत्र चंद्रसेन यास सेनापतिपदाचीं वस्त्रें दिलीं. परंतु त्या पदाचा कारभार बहुतकरून बाळाजिविश्वनाथ हे चालवीत असत; यामुळें त्यांचे व चंद्रसेन यांचें मानसिक वांकडें आलें होतें.

शके १६३३ सन १७११ चे सुमारास मोंगलाईतील बाबती व चौथाईचा अम्मल बसविण्यास शाहुमहाराजानीं चंद्रसेनसेनापति यांस पाठविला तेव्हां त्याजबरोबर बाळाजिविश्वनाथ होते; एके दिवशीं त्याचे उष्करांत पदाजी राउत यांची व बाळाजिविश्वनाथ यांचे पदकांतील कारकून व्यासराव यांचा हरणाचे शिकारी वरून इतका तंटा वाढला कीं, त्यामुळें चंद्रसेन व बाळाजी विश्वनाथ यांचे अतिशय वाकडें येउन बाळाजिविश्वनाथ यांचा पक्ष शाहुमहारास तो शरण आल्या वरून त्याणें धरला म्हणून चंद्रसेन शाहुमहाराजा बरोबर उघड लढाई करण्यास तयार झाला आणि किलीजखान नबाब यांजपाशीं मोंगलाईंत सरदारी धरून तेथून लढाई करण्यास आला; तेव्हां बाळाजिविश्वनाथ यास शाहुम

हाराजानीं सेनाकर्ते हें पद देउन चंद्रसेन यांजवर
लढायीस पाठविला त्याणें चंद्रसेन यांचा अगदीं प
राभवकेलाम्हणूनतोपरतभोंगलाईंत जाउन राहिला.

नंतर शाके १६३४ सन १७१२ चे सुमारें जाधवरा
व यांचे घराण्यांतील संताजीजाधवराव यास आणू
न त्यास सेनापतिपद दिलें तें थोडकेच दिवसांत त्या
जकडून काढून मानशिंग मोरे यास सेनापति केलें तें
पद सुमारें ७।८ महिने त्याजकडे होतें.

बाळाजि विश्वनाथ प्रधान यांणीं काठेवाड वगुज
राथप्रांतांत अम्मल बसविला तेव्हां त्याजबरोबर खं
डेरावदाभाडे हे असून त्यांणीं पुष्कळ मदत व शिपा
यगिरी केली म्हणून शाके १६३५ सन १७१३ या वर्षी
शाहु महाराजानीं खंडेराव यांस सेनापतिपदाचा अ
धिकार दिला.

पूर्वी शिवाजीमहाराजानीं राज्यव्यवस्था केली
तेव्हां वैदिक व पंडित ब्राम्हण यांस श्रावणमासीं दक्ष
णा देण्याचें चालू केलें होतें ती दक्षणा व कोटलिंगें-
श्रावणमहिन्यांत दाभाडे यांणीं करावीं असें सांगून
शाहुमहाराजानीं त्यांजकडून तळेगाव एथें चालू क
रविलें.

दाभाडे सेनापति यांजकडे गुजराथ अमदाबाद काठेवाड एथील मामले शाहुमहाराजानीं शके १६३५ सन १७१३ चे सुमारास सांगितले.

प्रधान यांचे लष्करांत दमाजी गायकवाड यांणीं दिल्लीस महमदशाहा यांजबरोबर लढाई झाली त्यांत पराक्रम केला ह्मणून शाहुमहाराजानीं दमाजीस समशेरबहादर हा किताब देउन सेनापतीकडील कारभार शके १६४० सन १७१८ चे सुमारें दिला.

शके १६४१ सन १७१९ चे सुमारें खंडेरावदाभाडे वारले त्यांचे पुत्र त्रिंबकराव यांस शाहुमहाराजानीं सेनापतिपदाचीं वस्त्रें दिलीं.

शके १६४७ सन १७२५ इसवी सालीं खंडेराव-यांस फत्तेशिंगभोसले यांजबरोबर कर्नाटकांत खंडणी घेण्यास पाठविलें.

शके १६५१ सन १७२९ चे सुमारास बुंदीवाले राजे यांचे भाउपणातील तंटा मिटविण्यास हिंदुस्थानांतबाजीरावबल्लाळ प्रधान गेले होते त्यांजबरोबर त्रिंबकराव सेनापति होता, त्याणें निजामखान मोंगल याशीं मिळून बाजिरावाचे नाशाविषयीं मसलत केली यामुळें त्रिंबकराव आणि बाजीरावप्रधान

यांची लढाई होऊन त्यांत त्रिंबकराव ठार मेला.

शके १६५१ सन १७२९ इसवी सालापासून सेनापति यांजकडे श्रावणमासची जी दक्षणा होत होती ती पुणे मुक्कामीं प्रधान हे शाहुमहाराज यांचे आज्ञेवरून देऊं लागले.

त्रिंबकराव मेल्यामुळें त्याची आई उमाबाई इला फार दुःख झालें तेव्हां शाहुमहाराजानीं तिजला सातान्यास आणून बाजिरावबल्लाळप्रधान यांचे समजुतीनें त्रिंबकराव यांचा पुत्र एशवंतराव दाभाडे यांस शके १६५३ सन १७३१ सालीं सेनापतिपदाचा अधिकार दिला. तो एशवंतजी दुर्व्यसनी झाल्या मुळें गुजराथ व काठेवाड वगैरे प्रांताचा अम्मल गायकवाड यांजकडे शाहुमहाराजानीं दिला.

शके १६७२ सन १७५० इसवी सालीं रामराजे यांचे कारकीर्दीत बाळाजि बाजिरावप्रधान यांजबरोबर एशवंतराव दाभाडे यांणीं सातारकिल्या नजीक लहानशी लढायी केली त्यांत एशवंतराव यास प्रधान यांणीं धरून तळेगांवास पोचविला.

चंद्रसेनजाधव मोंगलाईंत गेला म्हणून पूर्वी सांगितलें आहे त्याचा पुत्र रामचंद्र जाधवराव हा नि

जामअल्लीखान प्रधान याजवर लढायीकरतां चालू न आला त्यांजबरोबर होता तो मोंगलाईतून निघून प्रधानास येउन मिळाला. पुढें निजामअल्लीचा पराभव करून आधवराव थ माधवरावबल्लाळप्रधान पुण्यास आले आणि प्रधान यांणीं शके १६८५ सन १७६३ इसवीसालीं रामराजाकडून सेनापतीपदाचीं वस्त्रें रामचंद्रराव यास आणूनदिलीं. पुढें रामचंद्रराव हा गुजराथप्रांत मागूंलागला तो नदिल्यामुळें पुन्हा मोंगलाईत परतगेला.

शके १६८७ सन १७६५ इसवीचे सुमारास माधवरावबल्लाळप्रधान कर्नाटकांत गेले तेव्हां शिवाजीचे वेळेस संताजीघोरपडे म्हणून सरदार होता हें वर सांगितलें आहे त्याचा पुत्र मुल्हारराव घोरपडे याणें मदतीस येउन प्रधान यास मोठें सहाय्य केलें म्हणून सातारचे रामराजे यांजकडून सेनापतिपदाचीं वस्त्रें आणवून प्रधान यांणीं मुल्हारराव यांस दिलीं. पुढें थोडकेच दिवसांनीं हैदरनाईक म्हणून कर्नाटकांत बंडावा करूनहोता त्याणें मुल्हारराव यास धरून कैदेंत ठेविलें, आणि त्याचा सर्व मुलुख घेतला तेव्हांपासून सेनापति हें पद बरेंच दिवस कोणाकडे नव्हतें.

धाकटे एशवंतरावदाभाडे यांस दौलतरावशिंदे यांचे मुलीची मुलगी देउन लग्न झालें तेव्हां शिंदे यांचे सांगण्यावरून शेवटीलबाजीरावप्रधान यांणीं धाकटेशाहुमहाराज यांजकडून शाके १७१९ सन १७९७ इसवीसालीं एशवंतराव यांस सेनापतिपदाचीं वस्त्रें देवविलीं.

नंतर त्रिंबकजीभोसले पूर्वीप्रधान यांचे लश्करांत शिलेदार होते त्यांचे पुत्र चतुरसिंग हे धाकटे शाहुमहाराज यांजपाशीं होते त्यांचे पुत्र बळवंतरावभोसले हे प्रतापसिंहराजे यांचे फार प्रीतींत होते म्हणून त्यांजला प्रतापसिंहराजे यांणीं सेनापति हें पद दिलें ते बळवंतराव वारल्यावर त्यांणीं एक दत्तकपुत्र घेतलाहोता परंतु आपासाहेबमहाराज यांचेकारकीर्दीत त्यांणीं सेनापति ही पदवी खंडेरावराजे शिर्के यांस शाके १७६५ सन १८४३ इसवीया वर्षी दिली ती त्यांजकडे शाके १७७० सन १८४८ इसवी पर्यंत चालली.

समाप्त.

# सातारचे छत्रपतिमहाराज यांचे अष्ट प्रधानांतील डबीर (सुमंत) यांचे वंशाचा इतिहास.

शके १५८३ सन १६६१ इसवीचे सुमारास शिवाजीमहाराजांनीं आपले लष्करांत व्यवस्थे करतां अष्टप्रधान केले त्यांत सोनोपंत म्हणून त्याचे लष्करांत होता त्यास डबीर हें पद दिले. सोनोपंत हा शिवाजीचे लश्करांत शके १५६३ सन १६४१ पासून होता.

शके १५८६ सन १६६४ इसवीचे सुमारास शिवाजीमहाराज दिल्लीकडे गेले त्याजबरोबर सोनोपंत यांचा मुलगा त्रिंबक सोनदेव हा होता. त्याणेंशिवाजीमहाराजाबरोबर पुष्कळ हाल सोसून परत आला

शके १५९६ सन १६७४ इसवी साली राज्याभिषेक झाला तेव्हां अष्टप्रधानांची नांवें संस्कृतभाषेंत ठेविलीं त्यांत डबीर यांस सुमंत असें पद ठरवून तेंपद जनार्दन नारायण हणमंते यांस दिलें.

सुमंत यांचे राजमंडळांत असें काम होतें कीं त्यांणीं परराज्यातील वकिलीचें काम करावें आणि राजपत्रावर दरख्यांचे संबंधानें समत सुमंत हें निशाण

करावें. राजानें यांस पत्र लिहिणें तें वर राजश्री (ना व लिहून) पंडित असें लिहून शेवटीं बहुत काय लिहिणें सुज्ञ असा असें लिहिण्याची चाल होती.

सुमंतपदाचीं वस्त्रें खालीं लिहिल्या प्रमाणें महाराजाकडून होत होतीं.

## वस्त्रें.

१ प्रथम भेटीचे वेळेस चादर छडीदार.
१ पदाचीं वस्त्रें - मंदील, जामेवार, चादर छडीदार किनखाप पटका.

---

१ शिक्केकटार.
१ शस्त्रें - ढाल, तलवार.
१ हत्ती, घोडा.
१ जवाहिर - शिरपेच, चौकडा मोत्याचा कंठी मोत्याची, तुरा मोत्याचा.
१ चौंरी रुप्याचे दांडीची.
१ कलमदान नाडीचें.

---

या प्रमाणें देण्याची चाल होती. सुमंत याणीं म

हाराजास भेटीचे वखेस - कांहीं मोहरा नजरकरा
व्यालागत (वहुतकरून दाहामोहरा नजर कराव्या
लागत.)

शके १६०२ सन १६८० चेसुमारें जनार्दननारा
यण याणें संभाजीमहाराजांस कोल्हापुरचे किल्या
वर कैद करण्याची मसलत केली म्हणून संभाजीनी
त्यास रायगडास आल्यावर कैद करून त्याचे पायांत
बिडी घातली.

संभाजीमहाराज यांस मोंगलानीं धरून नेल्याव
र राजाराममहाराज कर्नाटकांत गेले तेव्हां त्याणींज
नार्दननारायण यांस कैदेंतून सोडविलें तो महाराजां
बरोबर कर्नाटकांत गेला.

शके १६१४ सन १६९२ सालीं राजाराममहाराज-
याणीं चंदीचे मुकामीं अष्टप्रधान केलें त्यांत महादा
जीगदाधर हणमंते यांस सुमंत पद दिलें. आणि ज
नार्दन नारायण यांस आमात्य पदवी दिली.

शाहुमहाराज मोंगलाचे कैदेतून सुटून दक्षणें
त येतअसतां शके १६२८ सन १७०६ इसवीचे सुमारें
औरंगाबादमुकामीं आनंदराव रघुनाथभोपळे हे औ
रंगाबादेस सुखवस्तुराहातहोते ते येउन भेटले ते

ह्यां ते हुशार व चतुर असें पाहून शाहुमहाराजांनीं त्यांस आपणाबरोबर आणलें.

शाके १६२९ सन १७०७ सालीं ताराबाईसाहेब यांजकडील सातारावगैरे किल्ले शाहुमहाराजानीं घेतलें तेव्हां आनंदराव याणें चांगला शूरपणा व हुशारी दाखविली.

महादाजीगदाधर ताराबाईसाहेब यांस मिलाफी होते म्हणून त्यांजला काढून शाके १६३२ सन १७१० चे सुमारें शाहुमहाराजानीं आनंदराव यांस सुमंत पदाचीं वस्त्रें दिलीं व कऱ्हाड प्रांतापैकीं नाडगौंडीचें वतन रुपये ५००० आणि खेरिज इनामीसरंजाम १००४१२॥ रुपयांचा दिला.

पुढें आनंदराव यांस निजामसरकारचे राज्यांत वकिलीस नेमिलें त्याणीं वकिलीचें काम चांगलें करून शाके १६७० सन १७४८ इसवी सालीं स्वर्गस्त झाले.

आनंदराव यास महिपतराव, रघुनाथराव, विठलराव, आणि कृष्णाराव असे चार पुत्र होते, त्यांतून रघुनाथराव हे आनंदराव यांचे बंधु व्यासराव यांस दत्तक दिलें ते औरंगाबाद एथें सुखवस्तु राहिले

त्यांजकडे कांहीं सरंजाम राहिलानाहीं.

आनंदराव यांचे पुत्रांपैकीं महिपतराव हे कर्ते व हुशार दिसल्यावरून शाहूनें शके १६७१ सन १७४९ इसवी सालीं सुमंतपदाचीं वस्त्रें देऊन सरंजाम व इनाम चालत आल्याप्रमाणें चालविला.

शके १६७३ सन १७५१ इसवीचे सुमारें रघुजीभोसले यांचा दंगा झाला त्यांणीं प्रांत जामोद एथील मोकासा १५००० व मोर्तजापूर एथील मोकासा २५००० व कसबे डिग्गी प्रांत शेवगांव १५०० व प्रांत राजापुर बऱ्हांदे एथील मोकासा ४५०० या प्रमाणें घेतला. बाकी सरंजाम ५५४१२॥ रुपयांचा महिपतराव यांजकडे राहिला.

या संधीस महिपतराव यांचे सापत्नबंधु कृष्णराव यांचा तंटा लागून कृष्णराव यांजकडे ११८७५ व महिपतराव यांजकडे ४३५३७॥ या प्रमाणें सरंजामाच्या वाटण्या झाल्या.

शके १६७५ सन १७५३ चे सुमारें बाबाजि बाजीरावप्रधान यांणीं सरंजामापैकीं ३५३३७॥ रुपयांचा सरंजाम जप्त केला बाकी रुपये ११२०० इतका सरंजाम महिपतराव यांजकडे राहिला.

पुढें महिपतराव निपुत्रिक मरण पावल्या वर त्यांचे बंधु विठलराव यांस माधवराव नारायण प्रधान यांणीं सुमंतपदाचीं वस्त्रें राजाकडून देविली व चालत आलेला सरंजाम चालविला ते विठलराव शके १७११ सन १७८९ इसवी सालीं स्वर्गस्त झाले त्या संधीस आणखीं १५०० रुपयांचा सरंजाम-जप्त झाला.

विठलराव यांस एक पुत्र जिवनराव होते त्यांजकडे सदर्हू सरंजाम व सुमंतपद चाललें.

राघोबादादा प्रधान यांचा व निजामअल्लीचा स्नेह झाल्यावरून मोंगलाईंत पीरजाद्यास सुमंत यांचे सरंजामापैकीं १४०० रुपयांचा मुलुख देवविला बाकीं ८३०० रुपयांचा सरंजाम जिवनराव यांजकडे चालला.

जिवनराव यांजवर शेवटील बाजिराव प्रधान यांचा लोभ असे. त्यांजकडे प्रधान यांजकडील गणपतीचे उछाहाचें व बागेकडील असीं कांहीं कामें होतीं.

जिवनराव यांस दोन पुत्र झाले. त्यांतून महिपतराव हे शके १७३१ सन १८०९ इसवीसालीं जि

वनराव असतानाच वारले दुसरे गोपाळराव का यम होते.

शके १७३२ सन १८१० आषाढ वद्य १३ मितीस जिवनराव यांणीं परलोक साधला तेव्हां त्यांचे पुत्र गोपाळराव यांस बाजिरावप्रधान यांणीं पदाचीं वस्त्रें देवविलीं हे गोपाळराव शके १७४३ सन १८२१ जेष्ट शुद्ध १५ रोजीं मृत्यु पावले त्यांची स्त्री वेणुबाई व महिपतराव यांची स्त्री कृष्णाबाई अशा दोघी ही त्या त्यांस पुत्र नव्हता.

गोपाळराव निपुत्रिक मेल्यामुळें त्यांचा फायदा जप्त करून बायांस इंग्रजसरकारांतून पेनशान झालें.

प्रतापसिंह महाराजांचे कारकीर्दींत बळवंतराव मल्हार चिटणवीस यांस कांहीं दिवस सुमंतपदवी दिली होती परंतु त्या संबंधानें कांहीं उत्पन्न चाललें नाहीं.

शके १७६५ सन १८४३ इसवी सालीं गोपाळराव यांची स्त्री वेणुबाई यांणीं इंग्रजसरकार व महाराजसरकारचा हुकूम घेऊन रामचंद्र या नांवाचा पुत्र विधानपूर्वक घेतला. ते रामचंद्रराव हल्लीं सातारा

एथें आहेत व त्यांजकडे नाडगौंडीपणाचें वगैरे इना
म चालत आलेले उत्पन्न ते दत्तक झाल्या पासून चाल
लें आहे.

मयत महिपतराव यांची स्त्री कृष्णाबाई हिणें दु
सरा एक अमृतरावया नांवाचा दत्तक घेतला होता; तो
इंग्रज व महाराजसरकारानीं नामंजूर केला त्यांजक
डे कांहीं उत्पन्न चालत नाहीं.

ती कृष्णाबाई शके १७६४ सन १८४२ इसवी
सालीं मयत झाली व वेणूबाई शके १७७४ सन १८५२
इसवीसालीं मयत झाली.

मुळपुरुष आनंदराव यांचें पुत्र कृष्णाराव यांज
कडे ११८७५ रुपयांचा सरंजाम वाटून दिला ह्मणू
न वर सांगितलें आहे त्यांतून त्यांचे चिरंजीव मल्हार
राव यांणीं निजामसरकारापाशीं काहीं राज्यकार
ण केल्यामुळें बाळाजि बाजीराव प्रधान यांणीं १०००
रुपयांचा सरंजाम जप्त करून सरकारांत घेतला. मल्हार
राव मेल्यावर त्याचा पुत्र आनंदराव यांजकडे रा
हिलेला सरंजाम चालत असतां शेवटील बाजिरा
व प्रधान यांची गैरमर्जी झाल्यामुळें ३३७५ रुपयां
चा सरंजाम त्यांणीं जप्त केला नंतर आनंदराव वा

रले त्यांजला कृष्णाराव व जिवनराव दोघे पुत्र असून त्यांतून जिवनराव हे निरवंशमरण पावले दुसरे कृष्णाराव हल्लीं असून त्यांजला तात्या व आपा असे दोनपुत्र आहेत कृष्णराव यांजकडे १५०० रुपयांचा सरंजाम व कांहीं नाडगौडीचें वतन हल्लीं चालत आहे तें पुणेजिल्ह्यांत बारामतीमुकामीं राहतात

रामचंद्र गोपाळ सुमंत यांस शके १७६१ सन-अठराशें एकुणचाळीस इसवी सालीं आपासाहेब महाराज यांणीं सुमंतपदाचीं वस्त्रें दिलीं.

रामचंद्रराव यांस दोनपुत्र झाले आहेत, एक मल्हारराव ९ वर्षाचा, दुसरा खंडेराव पांच वर्षाचा असे दोन आहेत.

या प्रमाणें या पदाची माहिती आहे.

रामचंद्रराव यांस जगदीश्वर इच्छेनें दोनपुत्र आहेत व त्यांची बुध्दी चांगली आहे या साठीं त्या दोन्हीपुत्रांस विद्वान करण्यास रामचंद्रराव यांणीं असला अमोलिक वेळ व्यर्थ जाऊंदेऊंनये.

समाप्त.

# सातारचे छत्रपतिमहाराज यांचे अष्ट प्रधानांतील न्यायाधिश यांचे वंशाचा इतिहास.

---

अष्टप्रधानांत न्यायाधीश हा सातवा अधिकार आहे आणि न्यायाधीश यांचें काम न्याय करण्याचें आहे या पदाचीं वस्त्रें बहुतकरून पटकाखेरिजकरून बाकी मंत्री यांचे इतिहासांत दाखविल्या प्रमाणें आहेत. निवाडपत्रावर समंत, न्यायाधीश व बार असें निशाण न्यायाधीश यांचें होतें.

न्यायाधीश हें पद फारशी व संस्कृतभाषेंत अष्ट प्रधानाचीं नांवें झालीं तेव्हां एकच नांवानें राहिलें

(न्यायाधीश ही पदवी कोणास कोणाते राजानें दिली याची माहिती.)

शके १५८३ सन १६६१ इसवी सालीं शिवाजी महाराज यांणीं प्रथम निराजीरावजी यांस न्यायाधीश केलें नंतर शिवाजीमहाराज दिल्लीस गेले त्यांज बरोबर सोनोपंत डबीर (सुमंत) हे होते त्यांचे पुत्र बाळाजीपंडीत यांस शके १५९६ सन १६७४ इसवीस राज्याभिषेकाचे वेळेस न्यायाधीशाहीप

दवी दिली.

शके १६१४ सन १६९२ इसवी साली राजारा ममहाराज यांणीं चंदीकडे निराजीरावजी यांस- न्यायाधीश केलें.

शके १६३५ सन १७१३ इसवीसालीं शाहुम हाराजानीं जाधवराव सेनापति यांजपाशीं होनाजी अनंत म्हणून कोणी गृहस्थ न्याय करण्यांत कुश ल होते म्हणून त्यांस न्यायाधीश ही पदवी दिली.

नंतर शके १६६१ सन १७३९ इसवी सालीं होना जीअनंत मृत्यु पावले, त्यांचे बंधू काशी अनंत यांस शाहुमहाराजानीं न्यायाधीशपदाचीं वस्त्रें दिलीं.

शके १६७२ सन १७५० इसवीसालीं रामराजे- यांणीं खंडेराव काशी यांस न्यायाधीश केलें.

शके १६८५ सन १७६३ इसवीचे सुमारें प्रधा न यांचे मुख्यकारभारी सखाराम बापू यांणीं रघुना थ बाजीराव यांजकडून विठलशिवदेव यांस न्याया धीशीचीं वस्त्रें रामराजे यांजकडून देवविलीं परंतु वि ठलशिवदेव बहुतकरून नेहमी पुण्यासच असत त्या स नावाला वस्त्रें मात्र झालीं होतीं.

धाकटे शाहुमहाराज यांचे कारकीर्दीस आपाजी

खंडेराव यांजकडे न्यायाधीशी सांगितली.

प्रतापसिंह राजे यांचे कारकीर्दीस चिंतामण चिटको भारे यांस शके १७५८ सन १८३६ इसवी या वर्षी न्यायाधीश ही पदवी दिली ती त्यांजकडे तीन वर्षे होती.

आपासाहेब महाराज यांचे कारकीर्दीस न्यायाधीश ही पदवी कांहीं दिवस जोतित्रिंबक फौजदार यांजकडे होती पुढें न्यायाधीश ही पदवी कोणाकडे चालली नाहीं.

---

समाप्त.

# सातारचे छत्रपतिमहाराज यांचे अष्टप्रधानांतील न्यायशास्त्री(पंडितराव) यांचे वंशाचा इतिहास.

अष्टप्रधानांत पंडितराव हा आठवा अधिकार आहे आणि पंडितराव यांचे कामदानाध्यक्षतेचें व शास्त्र सांगण्याचें असें आहे या पदाचीं वस्त्रें बहुतकरून मंत्री यांचे इतिहासांत दाखविल्या प्रमाणें आहेत, राजपत्रावर संमत पंडितराव असें करण्याची चाल होती.

१ पंडितराव ही पदवी कोणास कोणाते राजानें दिली याचा माहिती पारशीभाषेंत अष्टप्रधानाचीं नावें होतीं तेव्हां न्यायशास्त्री असें म्हणत होते. शिवाजीमहाराज यांचे राज्याभिषेकाचे वेळेस संस्कृत भाषेंत नावें ठेविलीं तेव्हां पंडितराव असें ठेविलें आणि तीच पदवी तेव्हांपासून चालू झाली.

शके १५८३ सन १६६१ इसवीसालीं शिवाजीमहाराज यांणीं रघुनाथभट यांस दानाध्यक्ष केलें तेंपद त्यांजकडे शिवाजीमहाराज यांचे कारकीर्दीत चाललें.

शके १६०५ सन १६८३ चे सुमारें संभाजीमहाराज यांचे कारकीर्दीस त्यांचे लोभांत असलेला परमदुष्टकवी कबजीकलुषा यांस त्यांणीं पंडितराव-ही पदवी दिली तो कबजीतुळापुरास औरंगजेबाचे लष्करांत शके १६१० सन १६८८ इसवी सालीं ठारमारला

शके १६१४ सन १६९२ इसवीसालीं राजाराम महाराज यांणीं चंदीकडे श्रीकाराचार्य कालगांवकर यास पंडितराव हें पद दिलें.

श्रीकाराचार्य हे ताराबाईसाहेब यांचे लक्षांत वागून त्याजबरोबर करवीराकडे गेले म्हणून शके १६३५ सन १७१३ इसवीसालीं शाहुराजानीं मुदगलभट उपाध्ये यांस पंडितराव हा अधिकार दिला ते मुदगलभट वारल्यावर त्यांचे वडील पुत्र रघुनाथराव यांजकडे पंडितराव ही पदवी चालली.

शके १७४९ सन १८२७ इसवी सालीं रघुनाथराव मृत्यु पावले नंतर त्यांचे वडील चिरंजीव रामचंद्रराव बाबा यांस प्रतापसिंह राजानीं पंडितराव हें पद दिलें. त्यांजला (रघुनाथराव) यांजला आणखीं दोन पुत्र आहेत त्यांचीं नांवें लक्ष्मणराव व बाळकृष्ण

राव

रामचंद्रराव पंडीतराव व लक्ष्मणराव व बाळकृ ष्णराव हे त्रिवर्ग हल्लीं सातारा एथें राहात आहेत त्यां तून लक्ष्मणराव यांस एक पुत्र लहान दोन वर्षांचा- आहे बाकी दोघांस कांहीं पुत्र संतती नाहीं.

मुळपुरुष संपादनकरणारे मुदगलभट यांचे बंधु वासुदेवभट यांचा व मुदगलभट यांचे कनिष्टपुत्र जनार्दन यांचा असे दोनपुरुषांचा पुष्कळ वंश आहे परंतु त्यांजकडे पंडितराव ही पदवी नाहीं म्हणून तो एथें लिहिण्याची गरज नाहीं.

पंडितराव यांजकडे हल्लीं मौजे चिंचणेर+ व विसापूर व चिमळे हे गाव व जमिनी कुळकर्ण वगैरे भाउहिस्सा जाउन सुमारें ५००० रुपयांचें उत्पन्न चालत आहे.

समाप्त

---

\+ चिंचणेर गांव सखाराम बापूजी अमात्य यांचे वंशास इंग्रजसरकारांतून दिले आहे ते बरगे यांचे चिंचणेर व हे पंडीतराव यांजकडे चालत आहे ते डांगे यांचे असे दोन चिंचणेर गांव साताराजि॰ त वेगळाले आहेत.

# साधारणमाहिती.

## साताराचे छत्रपतिमहाराज यांचे दरबारांत बसण्याची रीत व मान होते ते.

---

मध्यभागीं सिव्हासनावर छत्रपतिमहाराज- पाठीमागें हुजरे पाणीमोर्चले, चामरे, पंखे पानदान इत्यादि घेउन उभें राहावें सिव्हासनाचे बाजूस आस विश्वासू दाहाबारा उभे राहावे.

(महाराजांचे उजवे बाजूस अनुक्रमानें बसावे ते)

१ पंतप्रतिनीधी.
२ मुख्यप्रधान.
३ पंत आमात्य.
४ पंतसचीव
५ मंत्री.
६ चिटणवीस.
७ परराज्यांतील वकील
८ कारभारी - मुत्सदी तालुकेदार, मामलेदार व किल्लेदार योग्यते प्र०

---

महाराजांचे डावेबाजूस अनुक्रमानें बसावे ते.

१ पंडितराव
२ सेनापति.
३ सुमंत
४ न्यायाधीश.
५ फडणवीस.
६ सेनाधिकारी सरदा

र, शूरशिपाई योग्य
तेप्रमाणें.

---

ज्यांचे त्यांचे मुतालिक व कारकून यांणीं आपले मालकाचे पाठीमागें बसावें.

दोन्हीबाजूस पाठीमागें कारखान्याचे नाईक व हवालदार यांणीं उभें राहावें.

कचेरींत मुजरे करविणें, योग्यतेप्रमाणें बसविणें परकी कोणी असल्यास वर्दी लावणें हें सर्व दोन चोपदारानीं कचेरींत पुढें उभे असून करावें.

दरबारचे देवडीची चौकी चोपदार याचे ताब्यांत असावी. कोणासदरबारास बोलावणें तें चोपदारानें शिपायी पाठवावे.

---

छत्रपति महाराज यांची स्वारी चालण्याची
रीति.

क्रमाप्रमाणें एकामागें एक.

१ पुढें जरीपटका व भगवे निशाणाचे दोन हत्ती.
२ प्रधान व सेनापति यांचे जरिपटक्याचे हत्ती २
३ सर्व फौजेंतील निशाणें पागा करवल लोक.

दाला ईंत सेनाधुरंधरपदाचे अधिकारी व सेनासाहेब सुभापदाचे अधिकारी बिनी रक्षणास

४ तोफखाना, गाड्या, रथ.

५ सरदार शूर हत्तीवर व घोड्यावर

६ पायदळलोक, पटेकरी, बिटेकरी, सांग, बर्ची बाणेकरी, खासबारदार, बंदुकीचे लोक.

७ रणवाद्ये, ताशेमर्फे, हालग्या, वाजंत्री, शिंगाडे करणें.

८ कोतवाल हत्ती, सांडणी बाणाच्या कैच्या.

९ खासे घोडे कोतवाल.

१० मंगलवाद्यें शाहाजानें, कालुसनया घोड्यावर नगारखाना.

११ भाट बंदीजन

१२ लग्या, निशाणें, बाणदार, जरित्ततोमर, भाले, बोथाट्या, चोपदार, मालदार, वेत्रधारी.

१३ जेटीव मल्ल शूरलोक पायदळाचे.

---

इतके पुढें चालून मध्यें छत्रपतिमहाराज हत्तीवर अंबारींत समोंवताली हुजरे, पायदळ सरदार मावळे लोक लगत पाठीमागे जनानखाना.

त्या मागें अंतरानें.

उजवे बाजूचे अंगानें क्रमवार.

१ प्रतिनीधी.
२ प्रधान
३ आमात्य
४ सचीव.
५ मंत्री.
६. सोयरे आप्त मानकरी
७. चिटणीस, पोतनीस.

—

—

८ मुत्सदी, कारकून वगैरे जामदारखान्यालगत

डावे बाजूचे अंगानें क्र-
मवार.

१. सेनापति.
२. सुमंत.
३. पंडितराव.
४ न्यायाधीश
५. पागे वगैरे सरदार.
६. फडणीस व कोठनीस वगैरे कारकून.

—

—

या प्रमाणें अष्टप्रधान व मुत्सदी, मानकरी अंबारीतून व घोड्यावरून चालावयाचे.

शेवटीं साहेबनौबत व त्यांजबरोबर सरल ष्कर व फौज व लोक सरदार व सरलष्कर यांचे त

कैं सरंजामी.

अष्टप्रधान यांणीं महाराजांचे हुजूर दाहाकोसांचे आंत असतां नौबतखाना वाजवूं नये. हुडुम धुंशा वाजवीत महाराजांचे समक्ष व महाराजांचे स्वारींत जाऊं नये असा नेम होता परंतु अकलकोटकर, भोसले यांणीं महाराजांचे सांनिध्य असतां ही महाराजांची नौबत अखेर झाल्या वर नौबतखाना वाजवावा.




समाप्त.